## A Horror story in Marathi Language

## तीन वाजून तेरा मिनिटे

आज बुधवार ! संध्याकाळचे सडे नऊ वाजले होते. जेवण उरकून आलोक आपल्या बेड वर बसला होता. नेहमीप्रमाणे आज सुद्धा त्याला काहीतरी फेस करायला लागणार होते. डोळ्यातुन झोप हळू हळू आपल्या आगमनाची प्रचिती देत होती.

डोक्यातील नको असलेला विचार जावे यासाठी टीव्ही चालू केला., अर्धा तास काय तो वेळ गेला असेल, पण त्यातही त्याचे मन लागेना. शेवटी टीव्ही बंद करून पाठीमागे डोके टेकून तसाच बसून पडून राहिला.

आणि अजगराने आपले भक्ष संथ गतीने गिळावे तसे झोपेने त्याला आपल्या कव्हात घेतले.

सकाळ पासूनचा बौद्धिक परिश्रमाने आणि डोक्याबाहेरच्या विषयांच्या विचाराने तो आज पूर्ण थकला होता, त्याला झोप लागायला वेळ नाही लागली. आणि अशातच चांगला तासभर तशाच अवस्थेत पडून राहिला.

"गर्रर्र गर्रर्र गर्रर्र " कसलासा आवाज येवू लागला, मगाशी हवेमध्ये असलेला गारवा हळू हळू कमी होत आहे याची जाणीव त्याला ला होत होती, एका अनामिक भीतीची लहर आलोक च्या डोक्यातून चर्रर्र करून गेली. लोहार आपला भाता बडवावा, तसा लांबून कोठून तरी घणाचे घाव घालत असलेला अत्यंत भेसून आवाज येत होता. हळू हळू प्रत्येक घाणा सरशी तो आवाज आपल्या जवळ येत आहे असे भासू लागले होते. हे घणाचे घाव आपल्या डोक्यावर पडून डोके फुटले की काय अशी अवस्था झाली. सेकंदा सरशी ते घाव जवळ जवळ येत होते आणि ....

हे काय ! बापरे !! ते घणाचे आवाज दुसरी तिसरीकडून तर त्याच्याच डोक्यातून येत होते .

मोठ्या कष्टाने त्याने आपले दोन्ही काण बंद करून घेतले परंतु त्यामुळे ते आवाज जास्तच तीव्र होत गेले, तसतसे आता काहीच क्षणात डोके फुटून त्याचे हजार शकले होतील याबद्दल शंका राहिली नाही.

.... आणि शेवटी भीतीच्य अतिरेकामुळे त्याला जाग आली ! स्वप्न !! भयंकर स्वप्न ! पण जाग यायच्या एक क्षण आधी त्याला असे वाटले कि आपले डोके कोणीतरी धरून पाठीमागे जोर जोराने बडवत आहे, हा खेळ एवढ्यावर संपला नाही जशी जाग आली तसा तो ताडकन बेडवर बसला, तशात समोर दरवाज्यावर लक्ष जाताच समोर विक्षिप्त प्रकार दिसला.

दरवाजाच्या बाहेर एक कसलासा प्रकाश , प्रकाश म्हणता येणार नाही बहुतेक धूर किंवा एक वलय , काहीच सांगू शकत नाही ते काय ... शब्दात वर्णन न करता येण्याजोगी एक आकृती दरवाज्याच्या खालच्या फटीमधून जाताना दिसली.

जेव्हा भीती आलापी सीमा गाठते तेव्हा आपण त्या सीमे पलीकडे जिवाच्या आकांताने त्या भीतीच्या विरोधात उभे राहतो, आणि मनातील भीतीची जागा चीड,संताप या गोष्टी घेतात , आलोकने पटकन त्याच्या बेड च्या उजव्या हाताला असलेला बटन दाबून लाईट चालू केली, खोली मध्ये लख्ख प्रकाश पडला ! पूर्ण भानावर यायला त्याला दोन मिनिटे लागली. त्याचे शरीर वर पंखा आणि हवेत गारवा असून सुद्धा घामाने संपूर्ण भिजले होते , डोक्याचा पाठीमागचा भाग अजून भणभणत होता, हवेमध्ये उंदीर मारून

पडल्यावर जसा कुबटपणा येतो तशी किंचित दुर्गंधी पसरली होती, घड्याळाकडे लक्ष गेले !! आणि त्याचे डोळे सहाजिकरित्या अशा अवस्थेत सुद्धा आश्चर्याने विस्फारले गेले ! बरोबर तीन वाजून तेरा मिनिटे !

तेरा मे
(…. तीन महिने आधी )

"तेरा मे ही तारीख मी आयुष्यात विसरणार नाही मी , सुधाकर !" अपूर्वा चा गुगल टॉक वर मेसेज आला.

"हट्ट, एवढे चालायचेच गं! ", सुधाकर चा रिप्लाय .

"तुला काही वाटत नाहीये रे, पण या आधी मी इंडिव्यूजुअल अशा प्रोजेक्ट वर काम केलं नाहीये , हा सगळा प्रकार नवीन आहे ".

"येईल हळू हळू तुला पण अनुभव :p "

"नको बाबा ! झाला एवढा अनुभव पुरेसा आहे, असे प्रेशर मध्ये मी कधी काम केलं नाहीये"

"असो ! आजची वेळ आपण कशीतरी मारून नेऊ पण पुन्हा असा प्रकार होणार नाही याची काळजी आपण घेऊया पुढे"

"पण आजचे सबमिशन सक्सेसफुल होण महत्वाचे आहे. तेच झाले नाही तर कुठला प्रोजेक्ट आणि कुठले सबमिशन"

"होतंय गं ! आपण आपले बेस्ट देतोय, जेवढे शक्य आहे तेवढे करायचं, पुढचं पुढ बघून घेऊ "

"हम्म... ".

अरोरा अँड अरोरा या कंपनीचे व्हाईस चेअरमन एम.के. गुप्ता यांच्या ओळखीने आलोक कडे या कंपनीचे मॅगझीन आणि नवीन लोगो चे काम आले होते. अरोरा अँड अरोरा हे नाव महाराष्ट्रातील औद्योगिकांसाठी नवीन नव्हते, या कंपनीचे काम मिळवण्यासाठी ना जाणो किती ग्राफिक डिझाईन मध्ये आपला हातखंडा असलेल्या कंपन्या लाईन मध्ये उभ्या राहिल्या असत्या, परंतु गुप्ता सरांनी आलोक ची क्रिएटिव्ह आणि यंग थिंकिंग आजमावण्याचे ठरवले होते. हे काम आलोक कडे येताच या कामासाठी सुधाकर - फोटोशॉप मास्टर , अपूर्वा - कोरल ड्रॉ , नंदकिशोर - इन-डिझाईन मास्टर , रश्मी - सपोर्ट डिझाईनर अशा लोकांची टीम बनवून कामास सुरवात केली होती. नांदवाळ मध्ये जालंधर सोसायटी मध्ये ओढ्या लगतचा एक रो बंगलो घेऊन त्याठिकाणी हे सगळे डिझाइनर लोक एकत्र येऊन काम कर होते.

अरोरा एंड अरोरा चे अन्युअल मॅगझीन चे काम येऊन पंधरा दिवस सुद्धा झाले नव्हते तो पर्यंत गुप्ता सरांनी मॅगझीन च्या पहिल्या स्लॉट ची मागणी केली होती, आणि आज त्या स्लॉट ची डेडलाईन होती, रात्रीचा एक वाजला होता आणि सगळे डिझायनर्स आपापल्या घरी बसून आपापले काम संपवण्याचे नादात होते, गेले चार दिवस कोणी नीट झोपले नव्हते, सुधाकर आणि आलोक यांच्या जागरणाची हि तिसरी रात्र होती म्हणजे आज तेरा तारीख. आज संध्याकाळ पर्यंत मॅगझीन चा पहिला स्लॉट अरोरा अँड अरोरा च्या ऑफिस मध्ये पोहोच होणे महत्वाचे होते , यासाठी सगळे तहान भूक आणि झोप विसरून जीवाचे रान करत होते.

जेवढे शक्य आहे तेवढे सर्वानी बेस्ट देऊन कसे बसे हे काम आज सकाळी शेवट पर्यंत आणले. तयार झालेल्या मॅगझीन च्या सॉफ़्ट कॉपी चे आलोक आता शेवटचे प्रूफ रिडींग करत होता, छोटे छोटे

किरकोळ बदल लगेच सुधाकर ला सांगून जागच्या जागी करवून घेत होता. सकाळी दहा च्या दरम्यान अल्मोस्ट सॉफ़्ट कॉपी पॉर्न झाली असे म्हणायला हरकत नव्हती. तेव्हा वेळेची मर्यादा लक्षात घेता आलोक ने ही सॉफ़्ट कॉपी 'सागर प्रिंटिंग प्रेस'कडे चाळीस हजार प्रति छपाईची ऑर्डर दिली, काही करून या प्रती कोणत्याही परिस्थितीत जालंधर सोसायटी मधील ऑफिस मध्ये पोहोच होईल अशी व्यवस्था केली.

प्रती प्रिंटिंग साठी गेल्या आहेत तोवर आलोक ने सुधाकर , रश्मी, अपूर्वा, नंदकिशोर या सगळ्यांना थोडा वेळ विश्रांती घ्यायला सांगितले. सलग चार दिवस अविश्रांत काम करत असल्यामुळे सगळेजण खूप थकून गेले होते. त्यात मॅगझीन प्रिंटिंग ला गेले आहे म्हटल्यावर जवळ जवळ सगळयांचा रोल सध्यापुरता तरी संपला होता. त्यामुळे चार दिवसाचे टेन्शन रिलीझ झाल्याने सर्वांनी सुटकेचा निःश्वास टाकला.

***

झोप मोड झाली तेव्हा त्याच्या लक्षात आले कि बेडवर कुठे तरी अस्ताव्यस्त अवस्थेत असलेला त्याचा मोबाईल वाजतोय. साधारण चार तास सुधाकर ला गाढ झोप लागली होती. गेल्या पंधरा मिनिटांपासून आलोक त्याला कंटिन्यू फोन करत होता.

काहीशा अनिच्छेने सुधाकराने फोने उचलला कारण आलोक आता परत काहीतरी काम सांगणार किंवा करेक्शन आले असल्याचे सांगणार असे त्याला वाटले...

"सुधा ! वाईट बातमी ! प्रिंटिंग करून डिलिव्हरी देण्यासाठी येत असलेला आपला ट्रक वैजंती नाल्याच्या पुलावरून खाली कोसळला, सगळ्या प्रति पाण्यात वाहून गेल्या वर काही भिजून गेल्या , ड्राइव्हर जखमी आहे व आय.सी.यु मध्ये आहे . तू ऑफिस वर ये " एवढे बोलून आलोक ने फोन कट केला, तो बोलत असताना त्याच्या शब्दांच्या खोलुवरून तो नुकताच रडून सावरला आहे हे स्पष्ट जाणवत होते. पण इकडे सुधाकर हे ऐकून त्याच्या विश्वास बसवेना की हे खरे आहे कि खोटे आहे, आलोक चेष्टा करतोय का कि आपली अजून झोप झाली नाही व स्वप्नात आहोत.

तो तसाच उठून गॅलरी मध्ये घेला, संध्याकाळ होत आली होती. एक सिगारेट पेटवून एका पाठोपाठ एक चार पाच कश घेतले. आता जरा त्याला थाव्यावर आल्यासारखे वाटले, त्याला कळून चुकले की आपण एवढे दिवस रात्र राबून केलेले काम पाण्यात गेले आहे.
आलोक ने फोन वर "वैजंती नाला " असेच म्हटले होते ना ? आणि भीतीची एक सणक त्याच्या छातीतून गेल्याशिवाय राहिली नाही.

****

सुधाकर ऑफिस वर तेव्हा आलोक चेहर्याचा रंगाचं उडाला होता , बाजूला असलेल्या चेअर वर तो काही ना बोलता जाऊन बसला, पाच मिनिटे कोणी काही नाही बोलले.

"काय झालं नेमकं ? " शांतता सहन ना होऊन सुधाकर ने सुरवात केली.

'काय झालं ते तुला सांगितलं पण कसा झालं माहीत नाही'

'गुप्ता सरांना सांगितलंस हा प्रकार'

'हो ! सांगितलं पण आणि आपली मॅगझिनच ची ऑर्डर कॅन्सल झाली पण ! '

'काय ?? ऑर्डर डायरेक्ट कॅन्सल ? का? '

'बोर्ड ऑफ डायरेक्टर्स मध्ये असलेल्या बाकीच्यांचा आपल्याला ही ऑर्डर मिळू नये असं मत होतंच आधी पासून, कारण आपण सगळे नवे आणि आपली कंपनी सुद्धा नवी, ना आपला पोर्टफोलिओ आहे , ना क्लायंट्स , तरी सुद्धा गुप्ता सरांमुळे ही ऑर्डर आपल्याला मिळवता आली, पण आता ना माझ्याकडे गुप्ता सरांना द्यायाला उत्तर आहे ना गुप्ता सरांकडे त्यांच्या बोर्ड ऑफ डायरेक्टर्स ना द्यायला उत्तर आहे, ऑर्डर डिलिव्हरी झाली नाही हे कळताच त्यांनी ऑर्डर काढून घेतली , का होऊ शकत नाही वगैरे विचारायचे कष्ट सुद्धा घेतले नाही '.

हे चालू असताना अपूर्वा आणि रश्मी सुद्धा पोहोचल्या होत्या.

'ऑर्डर कॅन्सल झाली, या ऑर्डर साठी घातलेले पैसे बुडाले, सर्वांनी मिळून एवढे कष्ट घेऊन केलेले काम पाण्यात गेले, संपलंक की सगळं आता …… ' सुधाकर बोलला.

बोलत असताना त्याची नजर डेस्क वर असलेल्या मॅगझीन कडे गेली, हो हे तेच मॅगझीन होता ! आपलं स्वतः: डिझाईन केलेलं पाहिलं मॅगझीन,

'खरोखर अप्रतिम काम केलं आहे आपण' असं तो मनातल्या मनात स्वतः शीच बोलून गेला , आणि खरंच आहे ते, या टीम ने खरोखर अप्रतिम आणि क्रिटिव्हिटीने काम केलं होतं, पण प्रॉब्लम एवढाच होता कि त्यांच्या कामाची प्रशंसा करणारं कोणीच नव्हत. 'खरोखर अप्रतिम काम केलं आहे आपण' असं म्हणून त्याने मनोमन स्वात:चीच पाठ थोपटली, आपल्या आयुष्याती पाहिलं वहिलं कामाचा सुखात स्पर्श तो अनुभवत होता, आणि त्याचबरोबर पाण्याचे दोन थेम्ब त्याच्या डोळ्यात अलगत उभे राहिले.

'नाही सुधा ! लोगो ची ऑर्डर आजून आहे आपल्याकडे '.

'काय ?' सुधाकर गडबडला !

'होय लोगो चे काम अजून आपल्याकडेच आहे .'

बुडत्याला काडीचा आधार, आजू बाजूला सगळं काही चुकीचे घडत असताना एखादी छोटी सकारात्मक गोष्ट ऐकायला मिळाली की पुन्हा नवीच आशा निर्माण होते, कधी कधी असे होते की जेव्हा असे वाटत असते की आता सगळे संपले आहे, नियतीने आपल्या समोरचे सगळे दरवाजे बंद करून अंधाऱ्या कोठडी मध्ये डांबुन ठेवले आहे, अशावेळी त्या कोठडीमध्ये छपरावरून सगळे अडथळे पार करून आत येत असलेला प्रकाशाचा कवडसा सुद्धा किती सुखकारक असतो.

तो त्या वेळी एक दुवा असतो बाहेरच्या सुंदर जगातून आपल्याकडे आलेला, हा दुवा जर आपल्याला पकडता आला की आपण पुन्हा नवीन उमेदीने झालेला प्रक्रार विसरून, सगळे दुःख विसरून पुन्हा नव्हता जोमाने कामाला लागतो , अशावेळी मनात कोणतीही लालसा नसते, ना कोणत्या गोष्टीचा मोह असतो, ना मोठं मोठ्या अपेक्षा असतात.

सकारात्मकता आणि नकारात्मकता दोन्ही आपल्यात मनात दळलेले असतात, आपल्या आजूबाजूने सर्व काही वाईट , चुकीचे आणि नकारात्मक घडत असते, तेव्हा या सगळ्याचा परिणाम आपल्यावर होतो आणि आपल्या मनावर नाकारात्मकतेचे एक वलय निर्माण होते, अशा वेळी आपल्याला पुन्हा सकारात्मक

होण्यासाठी लागतो तो फक्त आणि फक्त सकारात्मकतेचा एक छोटासा दुवा, तो जर पकडता आला तर आपण जेवढ्या वेगाने मागे फरफटत गेलो आहे त्याच्या पेक्षा ही जास्त वेगाने आपल्या मनात लपून बसलेली सकारात्मकता आपल्याला पुढे ढकलते.

****

अरोरा अँड अरोरा कंपनीच्या लोगो साठीची थीम चा विचार सुधाकर ने डोक्यात पक्का बसवला, अपूर्वा , रश्मी अजून झालेल्या प्रकारातून सावरल्या नव्हत्या . त्यांना त्यांचा वेळ घेवूदे असा विचार करून सुधाकर ने त्यांना डिस्टर्ब केले नाही, इकडे सुधाकर आलोक ला घेऊन बसू लागला , हळू हळू लोगो च्या थीम वरून दोघांची चर्चा होऊ लागली. इतर कंपन्यांचे लोगो , त्यांची थिम पाहणे , त्याच्या रेफरन्स ने आपल्या थिम मध्ये बसदल करणे , वगैरे प्रकार चालू झाले.

दोघांनीं बसून एका आठवड्या मध्ये पन्नास थिम्स तयार केल्या, त्यापैकी प्रत्येक थिम वर काम करायचे , असे ठरले, दरम्यान होत असलेल्या मेल्स मुळे कामाला पुन्हा चालू झाले आहे हे रश्मी आणि अपूर्वा यांच्या लक्षाय आले. आता त्या दोघी नॉर्मल होत्या, लोगो डिझायनिंग च्या कामा मध्ये त्या सहभागी होऊ लागल्या . अशा तर्हेने हळू हळू सगळे पूर्ववत चालू झाले होते.
परिश्रम घेणे या लोकांच्या रक्तात होते , त्यामुळे हे काम शेवट पर्यंत जायला काहीच अडचण नव्हती. वेगवेगळ्या थिम चे असे एकूण पन्नास लोगो आलोक ने प्रथम गुप्ता सरांना दाखवले, "पन्नास " हा आकडा ऐकल्यावर गुप्ता सर आलोक कडे बघताच राहिले होते म्हणे. आलोक ने त्या वेळी प्रत्येक लोगो च्या पाठीमागे काय थीम आहे याचे एक प्रेझेंटेशन दिले. गुप्ता सर आलोक आणि टीम वर सहाजिक खुश झाले वर पुढच्या बोर्ड ऑफ डायरेक्टर्स च्या मिटिंग मध्ये हे प्रेझेंटेशन दाखवून यापैकी एक लोगो फायनल होईल असे आश्वासन दिले.

आणि या मिटिंग मध्ये गुप्ता सरांनी हे प्रेझेंटेशन सादर केले वर सर्वांच्या संमतीने त्यापैकी एक लोगो फायनल झाल्याचा फोन संध्याकाळी गुप्ता सरांनी आलोक ला केला. सर्वजण खुश होते, पण हा आनंद जास्त काळ टिकणार नव्हता हे त्यांना कोण सांगणार होतं ?

***

तेरा जून
(पुढे चालू)

---

फोन च्या रिंग ने त्याची झोप मोड झाली, लाईट लावली तेव्हा घड्याळात पहाटेचे साडे तीन वाजले होते, आलोक चा फोन होता.

एवढ्या रात्री आलोक चा फोन ? सुधाकर.

"हा आलोक बोल कि ", सुधाकर.

"सुधा ! नंदकिशोर ने सुसाईड केलीये , लवकर ये" आलोक.

सुधाकर च्या पायाखालची जमीन सरकली, फोन कट झाल्यावर आपल्याला खरोरखर फोन आला होता की भास झाला हेच कळेना, सिगारेट मारण्यासाठी पाकीट शोधायला गेला पण ते रिकामे झाले होते .

काय झाले ? नंदकिशोर ने आत्महत्या केली होती.

सुधाकर यांच्या आधी कोणाच्या मयताला सुद्धा गेला नव्हता. आणि आता आलोक म्हणतोय नंदकिशोर ने सुसाईड केलीये, आपला नंदकिशोर. खरंच ? हे अजिबात पटण्या सारखं नव्हतं, मनामध्ये एका बाजूला भीती आणि दुसर्या बाजूला मित्राची ओढ घेऊन त्याने गाडीला किक मारली व सुसाट नंदकिशोर च्या घराकडे निघाला.

तो पोहोचला तेव्हा घराच्या खाली आलोक उभा होता आणि त्याच्या सोबत आसपासचे तिघे चौघे होते ,

"काय झालं ?" सुधाकराने विचारलं

"नंदकिशोर , नाही राहिला. सुसाईड ..... " आलोक पुढे काही बोलू शकला नाही.

नंदकिशोर राहत असलेल्या अपार्टमेट मध्ये तो दुसऱ्या फ़्लोर वर राहत होता, त्याच्या फ्लॅट मध्ये एक हॉल होता आणि हॉल च्या साईड ला डाव्या बाजूला मोठी खिडकी होती , सुधाकर त्या खिडकीच्या दिशेने गेला, आणि समोरचे दृष्ट न पटणारे, अनपेक्षित, भयानक, क्रूर , कोणाच्याही काळजात धडकी भरावे असे होते .....
त्या हॉल मध्ये असलेल्या पंख्याला दोर बांधून नंदकिशोर ने स्वतः ला लटकावून घेतले होते , हवेच्या झोक्याने ते प्रेत हळू हळू कधी या दिशेला तर कधी त्याच्या विरुद्ध दिशेला असे झोकांड्या खात होते , प्रेताच्या तोंडातुन जिभ पूर्ण बाहेर येऊन गळ्यापर्यंत लटकत होती , डोळे इतके बाहेर आले होते की आता ते समोर उडून पडतात की काय असे वाटावे , भयानक ! अति भयानक.
आलोक ने पोलिसांना फोन केला , पोलीस यायाला अजून एक तास अवकाश होता, तोपर्यंत सगळी मंडळी तशीच बसून होती, नंदकिशोर च्या घरच्यांबद्दल कोणाकडे फारशी माहिती नव्हती, त्यामुळे कोणा बोलवायचे की नाही असा प्रश्नच पडला नव्हता.

तासाभरणे पोलिसांची गाडी आली, त्यांनी अपार्टमेंट ला सिक्युरिटी गार्ड ठेवावा एवढी अपार्टमेंट मध्यले लोक हाय प्रोफाईल नव्हते. पोलिसांनी अपार्टमेंट चे विना कुलुपाचे गेट उघडून वर जाऊ लागले. सुधाकर आणि आलोक तिथेच थांबले , कोणाचे त्यावेळी धाडस झाले नाही. थोड्या वेळाने पोलीस परत आले, कारण दरवाजा आतून बंद होता, नंदकिशोर च्या फ्लॅट ला पाठीमागून एक दरवाजा होता सुधाकर ला माहीत होते , त्याने पोलिसांना तसे सांगितले.

"चल दाखव "

असे ऐकल्यावर सुधाकराचे हात पायाच गळाले, आता शेवटी जायलाच लागणार तर, असे म्हणून सुधाकर पुढे चालू लागला, पाठीमागच्या झुडुपातून एक छोटा जिना वर थेट नंदकिशोर च्या फ्लॅट च्या मागच्या दरवाजापर्यंत जात होता , या रात्रीचा वेळी तो दरवाजा नेहमी पेक्षा जास्त भेसूर दिसत होता.
बहुतेक त्या दरवाज्याला आतून अलगद काडी लावली होती, त्यामुळे पोलिसांनी थोड्याशा परिश्रमाने तो उघडला.
पोलीस आत घुसले , व पंचनामा चालू केला . सुधाकराने ठरवले कि काही झाले तरी आत जायचे नाही, पण का माहीत नाही, त्याला बाहेर स्वस्थ बसवेना, जे काय भयानक प्रकार आहे त्याला फेस करून असे त्याला मनोमन वाटू लागले वर आलोक ला कनव्हिन्स करून दोघांनी आत प्रवेश केला , तोपर्यंत तिथे सोमेश व कार्तिक सुद्धा येऊन पोहोचले होते, हे नंदकिशोर चेच मित्र, आलोक कडे यांचे नंबर होते त्याने यांना फोन करून सांगितले होते . सुधाकर आणि आलोक सोबत हे दोघे सुद्धा आत आले.

आत पोलीस पंचनामा करण्यात व्यस्त होते, व वाऱ्याच्या झोता सोबत प्रेत हळू हळू कधी या दिशेने तर कधी त्या दिशेने फिरतच होते , जे दृश्य मगाशी लांबून बघितले होते तेच दृश्य जवळून , प्रेताचे तोंड विरुद्ध बाजूला होता, आणि वाऱ्याच्या प्रवाहा सोबत हळू हळू ते आमच्या बाजूला वळत होते , कोणाची ते पाहायची इच्छा नव्हती पण कोणाचे डोळे त्याची परवानगी देत नव्हते , सगळ्यांची नजर एक टक प्रेताकडे लागली होती, हळू हळू करत ते प्रेत संपूर्ण सुधाकर आणि आलोक च्या दिशेला झाले आणि वीज चमकावी तशी दोघांच्या काळजातुन क्षणभरासाठी एक सणक निघून गेली , भीतीने पोटात धस्स झाले होते .

हे समोरचे प्रेत नंदकिशोर चे आहे पटण्या सारखे नव्हते . या दृश्यातून सावरतोय तोपर्यंत पोलिसांनी दुसरा धक्का दिला. त्यांचा पंचनामा करून झालेला होता.

'खाली उतारा'!

'काय ?' सुधाकर जवळ जवळ ओरडलाच

'आहो ! प्रेत खाली उतारा ' तोच पोलीस शक्य तितक्या मऊ शब्दामध्ये बोलण्याचा प्रयत्न करत होता .

'आम्ही? '

'होय !'

सगळे एकमेकांच्या तोंडाकडे बघू लागले , कोणाची इतकी हिम्मत होती पुढाकार घ्यायची ?

'अरे आवरा लवकर, प्रेत पोस्टमार्टम साठी न्यायाचे आहे'.

पुढे त्यांनी नंदादीशोर चे प्रेत कसे उतरले, उचलून जिन्यावरून खाली कसे उतरले, आणि शववाहिके मध्ये कसे नेले हे दिव्यच होते.

***

"हॅलो आलोक, कधीपासून फोन ट्राय करतोय , ... " ... गुप्ता सर !

"सॉरी सर मी जरा... "

"बरं असुदे , ऐक. तुम्ही पाठवलेल्या लोगोंपैकी एक फायनल झाला आहे, पण त्यात थोडेसे बदल आहे लागणार आहेत, उद्या सकाळी ठीक आकारा वाजता ऑफिस वर ये आपण बोलूया !"

"उद्या ? सर ?"

"हो हो ! चाल बाय. "

गुप्ता सरांनी फोन ठेवला. नंदकिशोर चा प्रकार होऊन आज केवळ पाचच दिवस झाले होते, आता नाईलाजाने गुप्ता सरांच्या ऑफिस वर उद्या जावे लागणार होते. अशा वेळी आपले ज्या कामात पॅशन आहे ते काम सुद्धा किती भकास वाटायला लागते.

दुसर्या दिवशी आलोक ने सुधाकर आणि अपूर्वा ला ऑफिस वर बोलावून घेतले.

"सुधा, आज गुप्तता सरांनी मला बोलावले होते, आपण पाठवलेल्या लोगोंपैकी हा लोगो फायनल झाला आहे .... ", आलोक आपल्या लॅपटॉप वर लोगोची इमेज दाखवत बोलला.

"... पण यामध्ये थोडे करेक्शन्स सुचवले आहेत , त्याचे डॉक्युमेंट मी तुम्हा दोघांना मेल केले आहे, त्या नुसार आपल्याला लवकरात लवकर करेक्शन करून घ्यावे लागणार आहेत. " आलोक ने आपले वाक्य पूर्ण केले .

यावर कोणी काहीच बोलले नाही.

सुधाकर ने मेल वाचून काढला आणि अपूर्वा सोबत करेक्शन करायला घेतले. दोन दिवसा मध्ये त्याने काम आटोपले, कारण नेहमीप्रमाणे डेडिकेशन देऊन काम करणे या घडीला तरी शक्य नव्हते. करेक्शन झालेला लोगो त्याने आलोक ला मेल केला. अरोरा अँड आरोप या कंपनीची ऑर्डर टेक्निकली आता पूर्ण झाली होती असे म्हणायला हरकत नव्हती.

***

## आलोक

“सुधाकर मला तुझ्याशी थोडं बोलायचं आहे तू घरी येशील का ?” आलोक च्या बोलण्यावरून तो घाबरलेला आहे हे कळायला सुधाकर ला वेळ लागला नाही.
“अर्जंट आहे का ?” सुधाकर
“तसे नाही रे, पण .... तू ये ...”
“बरं बरं , आलो तासाभरात.” असं म्हणून सुधाकर ने फोन कट केला.
आता आज काय नवीन ऐकायला मिळतंय कोणास ठावूक असं म्हणत सुधाकर ने आवरायला घेतले. कारण जेव्हापासून यांनी एकत्र येऊन काम करायला सुरवात केली होती तेव्हापासून काही ना काही वाईट घडत होते ... आणि सगळे अनपेक्षित. आतापर्यंत जे काही घडले त्याच्या दोष तरी कोणाला द्यायचा विचार करून सुधाकर ठाकला होता, नंदकिशोर च्या आत्महत्येचे कारण अजून कळाले नव्हते. एकंदरीत सगळे व्यवस्थित चालत असताना असे काय घडले ज्याच्यामुळे सगळे बिघडायला लागले , कोणाचे काय चुकले ? नाही ! का कोणी मुद्दाम बदला घेण्यासाठी हे प्रकार करत होते ? छे ! चान्सच नाही ! सुधाकर चे डोके विचार करून करून सुन्न झाले होते, तेवढ्यात आलोक चा फोन आला होता.

***

“ये ये सुद्धा, आत ये !” दरवाज्याची बेल वाजताच आलोक ने चटकन पुढे जाऊन दार उघडले
“हे काय ? तू अजून पारोसा आहेस ? आता उठलास की काय ?” सुधाकर ने आशचर्याने विचारले .
“उठायला आधी झोप लागायला हवी ना.”
"का ? काय करत होतास रात्रभर ? "
“ये बस आधी सांगतो सगळं”,

“अरे रात्री खूप विचित्र प्रकार घडला , मला खूप भीती वाटतात आहे सुधा !” दोघे कोच वर रिलॅक्स होताच आलोक ने बोलायला सुरवात केली.
“आलोक , काय घडले ते स्पष्ट सांग, कोड्यात नको बोलू”
“काल आपण ऑफिस मधून बाहेर पडलो, मी तसेच मेस वर जाऊन जेवून रूम वर आलो. तिन्ही लावून पडलो असताना मला कधी झोप लागली कळाले सुद्धा नाही, एवढ्या लवकर मी कधीच झोपत नाही. मला जाग आली तेव्हा घडाळात पहाटेचे तीन वाजून तेरा मिनिटे झाली होती , माझे अंग घामाने बडबडले होते , एक अतिशय वाईट स्वप्न पडले होते. स्वप्न म्हणजे असे आपल्याला नेहमी स्वप्ने पडतात तसे काही नाही, पण .....” सांगत असता आलोक थांबला, तू खूप घाबरला होता.
“आलोक, आजींबात न घाबरता सांग काय ते .” सुधाकर अधिकारवाजा शब्दात बोलला.
“सुरवातीला मला लोहाराने त्याचा भाता बडवावा तसा आवाज यायला लागला, हळू हळू तो आवाज जवळ जवळ येऊ लागला, त्या प्रत्येक आवाजा सरशी माझे डोके भणभणू लागले, जसा जसा तो आवाज जवळ येत होता माझ्या डोक्यात कळा यायला सुरवात झाली. थोड्या वेळाने मला असे जाणवले की हा आवाज माझ्याच डोक्यातून येत आहे ... तसा माझ्या अंगावर सटकून काटा आला. मला वाटले की मला जाग आली आहे, आणि या जाणीवे मध्ये असताना मला असे जाणवले कि कोणीतरी माझे डोके जोर जोराने उचलून पाठीमागे बडवत आहे. जेव्हा मला पूर्ण जाग आली तेव्हा, थंडीचे दिवसात वर फॅन असताना माझे अंग घामाने पूर्ण भिजले होते, मी जे अनुभवले त्यापैकी कोणता प्रकार स्वप्नात घडला आणि कोणता जागेपणी हे मी नाही ठरवू शकत, पण एकूण असा अनुभव मी आयुष्यात पहिल्यांदा घेत आहे.” असे म्हणून त्याने दोन्ही हापाणी तोंड झाकून घेतले .

आलोक खूप घाबरला होता सुधाकरला यावर नेमके काय बोलावे हे कळेना, एक साधे स्वप्न होते असे जरी म्हटले तरी आलोक ला एवढा घाबरलेला सुधाकर ने आजपर्यंत पहिल्यांदा पाहिला होता.
“आलोक ! काही घबरू नको, साधे स्वप्न आहे ! नंदकिशोर च्या प्रकारामुळे तुझ्या मनात भीती बसली आहे, त्यामुळे अशाप्रकारची स्वप्ने वगैरे पडतात, असो. , आधी तू पटकन आवरून घे, सकाळचे आकारा वाजलेले आहेत, जाऊ चहा घेऊ, थोडे बरे वाटेल” सुधाकरला खरे तर काय बोलायचे काळात नव्हते पण, काहीतरी शब्द जोडून आलोक ला धीर द्यायचा करू लागला.
“नाही सुधा ! जेव्हा मला जाग आली, तेव्हा हवेत अजिबात गारवा नव्हता, आणि हवेमध्ये एकप्रकारची हलकीशी दुर्गंधी सुटली होती.”
“पडलेल्या स्वप्नाचा तुझ्या मनावर अजून परिणाम राहिला असेल त्यामुळे तुला तसे वाटले असेल, करू नको , उठ आणि आवरायला दिघे पटकन”. सुधाकराला विषय टाळायचा होता , कारण त्याचे डोके आता पूर्णपणे स्टक झाले होते.
थोड्याच्या नाराजीने आलोक तेथून उठला.
आलोक ला अशा भेदरलेल्या अवस्थेत सुधाकरने कधीच पाहिले नव्हते, राहून ना राहून हा काहीतरी वेगळा प्रकार आहे अशी शंका येऊ लागली.

नंदकिशोरने आत्महत्या केली ती बुधवार ची पाहाट होती. आणि आज सुद्धा बुधवार होता योगागयोग आहे की यांच्या पाठीमागे काही विशेष कारण. आलोक च्या मनात भीती बसली असेल तर आज जो प्रकार झाला तो नंदकिशोर च्या घटणे नंतर दुसऱ्या किंव्हा तिसर्या दिवशी का नाही झाला ? अशांपैकी बऱ्याच प्रश्नांची उत्तर सध्यातरी मिळणार नव्हती.
“"छे !" आपण उगाच इतका विचार करतोय, एक साधे स्वप्न तर होते” असे म्हणून सुधाकर ने मनात आलेले सगळे विचार झटकून टाकले. पुढचे दोन चार दिवस आलोक ला व्यवस्थित झोप लागली होती,

त्यामुळे आलोक आणि सुधाकर दोघांना कळून चुकले कि एका स्वप्नाला आपण उगाच जास्त महत्व दिले होते .

***

“सुधा ! परत तेच स्वप्न !” एवढेच बोलून आलोक ने फोन कट केला. तसा सुधाकर च्या पोटात गोळा आला. जी गोष्ट नाही नाही असे आपण स्वात:च्या मनाची समजूत घालत होतो, शेवट तोच प्रकार पुढे होता. या प्रकरणाला वेगळे वळण लागले होते हे आता निश्चित झाले होते.
"आलोक पटकन आवरून बस, आपल्याला लगेच 'धोंड' ला जायचे आहे . एक अर्ध्या तासात मी तुला न्यायला येतो." फार काही ना सांगता सुधाकर ने फोन कट केला.
सुधाकर आलोक च्या घरी पोहोचला तेव्हा आलोक कुलूप घालून बाहेरच येऊन थांबला होता.
सुधाकरने अलोक ला घेतले आणि गाडी धोंड च्या दिशेने धावू लागली
जसे माणूस आजारी पडल्यावर डॉक्टर कडे जातो तसे या अतिमानवी प्रकारातले सुद्धा डॉक्टर्स असतात, यातले काही डॉक्टर्स बनावट किंवा दिखाऊ असतात तर काही अस्सल असतात अशा डॉक्टर्स ना साध्या भाषेत तांत्रिक, देवर्षी, साधू अशी बरीच नावे आहेत. अशाच एका देवर्षींकडे सुधाकर आणि आलोक चालले होते .
"धोंड ग्रामपंचायत आपले सहर्ष स्वागत करीत आहे" अशी एक मोठी कमान लागली .... गावात गेल्यावर सुधाकर ने दोघा तिघांना वाळके बाबांचे घर कुठे आहे असे विचारले . चांगले दहा बारा लहान ,मोठ्या गल्ल्याना सामोरे जाऊन वाळके बाबांच्या घरा जवळ येऊन सुधाकर ची गाडी थांबली. एकदम साधे कौलारू घर , घराच्या समोर एक हनुमानाचे अगदी लहान मंदिर होते. घराचा दरवाजा उघडाच होता , सुधाकर ने काडी वाजवली, तसे एक साधारण सत्तरीच्या आसपास असलेल्या वयस्कर व्यक्ती समोर आली ..

"वाळके बाबां ? "

"आत या "

एवढे बोलून त्या गृहस्थानी आम्हाला आत बोलावले , एकदम टिपिकल खेड्यातील घर असावे अशाप्रकाराचे ते साधे कौलारू घर होते , बसण्यासाठी त्यांनी चटई अंथरली होती, आम्ही जाऊन त्यावर बसलो . बाबा आम्हाला बसवून आत गेले .
बाबा थोड्या वेळाने परत आले आणि आमच्य समोर बसले.
साधी खेडवळ माणसे असतात साधारण तसा त्यांचा अवतार होता , पण डोक्यावर मोठे वाढलेले केस त्यांनी वरच्या बाजूला वाटोळे करून गोल गोल बांधले होते, हे त्यांनी डोक्याला अर्धवट गुंडाळलेल्या पांढऱ्याशा कपड्यावरून लक्षात येत होते. त्यांना 'जटा' असे म्हणतात.
"बाबा, मी सुधाकर आणि हा आलोक." सुधाकर ने ओळख करून दिली.
“नमस्कार” बाबानी हात जुडून आमचे स्वागत केले.
“बाबा ! गेले काही दिवस आम्ही खूप वाईट अवस्थेतून जात आहोत, सगळे चांगले चालू होते, आणि अचानक ...” सुधाकर बोलता बोलता थांबला तेव्हा, बाबानी 'थांबा' असा हातानी इशारा दिला होता , हे खाली मुंडी घालून बसलेल्या आलोक ने डोके वर करताच बाबांच्या हाताकडे बघितल्यावर लक्षात आले.
बाबा बराच वेळ काही न बोलता आमच्याकडे बघत राहिले . नंतर ते आत गेले , परत आले तेव्हा त्यांच्या हातात तांब्याच्या मोठ्या पात्रात पाण्यानी भरलेले भांडे होते, त्या भांड्याच्या रंगावरून ते खूप जुने होते असे दिसत होते. ते सरळ आलोक च्या पुढे येऊन बसले आणि ते भांडे आलोक च्या समोर ठेवले.

"यावर फुंक मार ", बाबा बोलले.
बाबांनी आलोकलाच असे करायला सांगितले होते , हे दोघांच्या सुद्धा लक्षात आले. बाबांनी सांगितल्याप्रमाणे आलोक ने कृती केली. ते भांडे घेऊन बाबा बाजूला असलेल्या मारुतीच्या मूर्ती कडे वळाले, ते भांडे त्यांनी त्या मूर्ती समोर ठेवले. व बराच वेळ त्याच्या आत बघत राहिले. थोड्या वेळानी पुन्हा ते पाणी ओतून नवीन पाणी भरून आणले वर आता सुधाकर ला त्यात फुंकर मारायला सांगितली. वर पुन्हा ते मूर्ती समोर जाऊन बसले.
साधारण पंधरा वीस मिनिटांनी बाबा उठले. तोपर्यंत घरातील एका गृहस्थाने चहा आणला. चहाचे दोन घोत पोटात जाताच त्यांना जरा हुशारी आली. आता बाबा काय बोलतात यांच्याकडे दोघांचे लक्ष लागले होते.
“तुम्ही पाच लोक होता , आता चार आहात, एका मागोमाग एक संकटांची टोळधाड तुमच्यावर पडत राहणार, ‘ते’ तुम्हाला सुखानं जगू देणार नाही, एका एका ला पकडून ते सतत छळत राहणार, आता जी व्यक्ती हयात नाही, तिला 'त्याने' दिलेला त्रास सहन झाली हे कारण आहे , आता ती तुम्हा दोघांनपेकी एकाच्या पाठीमागेल लागली आहे, आणि 'त्याच्या' पुढची जी वेळ असणार आहे ती आता ज्याला त्रास नाहीये त्याला पकडणार आहे.” एवढे बोलून बाबा थांबले. पुढे बाबा आणखीन काहीतरी सांगतील या आशेने दोघांपकी कोणी बोलले नाही. बाबांच्या एका एका शब्दा बरोबर हजार बाण शरीरात घुसावेत तसे सुन्न करत होते. बाबांचे बोलून झाले होते ते आता दोघांच्या ही लक्षात आले होते.

“बाबा कोण 'तो' ? आम्ही कोणाचे काय वाकडे केले आहे ? तो का छळतोय आम्हाला ? त्याच्या उद्देश काय आहे ? त्याची पुढची वेळ ? म्हणजे काय ? .....” सुधाकर भेदरलेल्या आवाजात असहाया सारखा बोलत होता.
“बाळा ! तुम्ही कोणत्या परिस्थितीतून जात आहात कल्पना आहे, मी तुम्हाला खोटी आशा देणार नाही, मला जे काही दिसले ते तुम्हाला सांगितले. या प्रश्नाची उत्तर नाहीत माझ्याकडे. तुमचे हे संकट खूप वेगळे आहे. ना तुमच्यावर कोणी करणी केलीये ना भुतबाधेचा त्रास आहे. मी तुम्हाला घाबरवू इच्छित नाही पण जे आहे ते आहे तसे सांगणे माझे कर्तव्य आहे, तुमच्या पाठीमागे एक "खविस" लागला आहे. खविस म्हणजे लहान मुलाचे भूत, तुम्ही लोकांनी त्याला कुठे तरी छेडले आहे.”
“बाबा काय बोलताय ? कसला खविस ... कुठून आला ?... ”
"आला नाही, भुते कधीही कुठे ही जात नाहीत, ती आपापल्या ठिकाणी असतात, जातो तो आपण आणि आपल्या नकळत त्यांना इजा करतो. "
“बाबा, आपण जे काही बोलताय ते सगळे माझ्या डोक्याबाहेरचे आहे . मला काय आहे ते तर काळात नाहीये , पुढे काय करायचे ते कळायचं प्रश्नच नाही. प्लिज यातून काहीतरी मार्ग काढा.”
“बाळांनो ! मी तुम्हाला खोटी आशा दाखवणार नाही, मी साधी भुते काढणारा माणूस आहे, खाविसाची लागण माझ्या हातातली बाब नाही”.
“ठीक आहे बाबा निघतो आम्ही, खूप मोठ्या निराशेने दोघे उठले आणि जायला निघाले”
“थांबा पोरांनो ! मला तुमचा नंबर द्या, साधारण पाच वर्षा पूर्वी माझ्याकडे एक पोरगा आलेला, या अतिमानवी प्रकाराचा अभ्यास करण्यासाठी, त्याची तुम्हाला कदाचित मदत होईल, त्याच्या संपर्क मी शोधून तुम्हाला सांगतो.” बाबा बोलत असताना आपण या पोरांसाठी काही करू शकत नाही याची खंत त्यांच्या तोंडावरून स्पष्ट जाणवत होती,

सुधाकराने त्याचा आणि आलोक चा नंबर बाबांच्या डायरी मध्ये लिहून दिला. जाता जाता बाबांनी दोघांच्या गळ्यात एक एक ताईत घातले आणि अंगाऱ्याची पुढ दिली आणि हा अंगारा नेहमी जवळ ठेवा असे सांगितले.

बाबानी जे काही सांगितले त्यात तथ्य आहे यावर शंका घेण्यासारखे नव्हते, कारण त्यांनी बोलताना सुरवातच तुम्ही पाच होता आता चार आहात अशी केली. जाताना त्यांनी काही पैसे घेतले नव्हते . या भेटीवरून वाळके बाबा कुणी ढोंगी नव्हता याची दोघांना खात्री झाली होती. मग बाबा जर असाल असतील तर त्यांनी सांगितले ते सुद्धा खरे होते. एक खवीस त्यांच्या मागे होता. सुरवातीला त्याने नंदकिशोर ला छळले त्याच्या त्रासाला कंटाळून त्याने आत्महत्या केली , आता तो अलोक च्या पाठीमागे होता, आणि बाबांच्या म्हणण्या नुसार त्या खाविसाच्या पुढच्या टायमिंग ला त्याच्या मोर्चा सुधाकर कडे वळणार होता.

***

## तेरा जुलै

दुपारचे साधारण पाच वाजले असतील, सुधाकर आपल्या रुम च्या गॅलरी मध्ये सिगारेट फुंकत या सगळ्या गोष्टींचा विचार करत बसला होता, तेवढ्यात फोन ची रिंग वाजली.
'गुप्ता सर ?' सुधाकर आश्चर्य वाटले कारण गुप्ता सर काही काम असेल कॉल करत असत.
"हॅलो, कोण सुधाकर का ?"
"गुड इव्हिनिंग सर , सुधाकरच बोलतोय"
"आलोक चा फोन लागत नाहीये, तुमच्यापैकी कोणीतरी ताबडतोब ऑफिस वर येणे गरजेचे आहे." गुप्ता सरांचा आवाज जरा चढलेला वाटत होता.
"काही प्रॉब्लम आहे का सर ? तसे असेल तर मी आताच्या आता घरातून बाहेर पडतो "
"ते तुम्ही इकडे या मग बाकीचे बोलू". असे म्हणून गुप्ता सरानी फोन कट केला.
नक्कीच काहीतरी प्रॉब्लम झाला होता हे त्यांच्या बोलण्यावरूनच काळात होते, आजपर्यंत एवढे काही घडून गेले होते की आता वापरात काही सहन करण्याची टाकत नव्हती , पण आलेल्या परिस्थितीला सामोरे न जाण्या इतका भ्याड तो नक्कीच नव्हता , सुधाकराने प्रथम आलोक ला फोन लावला पण तो आउट ऑफ कव्हरेज दाखवला. त्याच्या घरी जाऊन त्याला घेऊनच गुप्ता सरांच्या ऑफिस वर जावे का ? विचार प्रथम त्याच्या मनात आला पण , तेवढा वेळ त्याच्याकडे नव्हता . त्यामुळे तो लगेचच बाहेत पडला.

***

सुधाकर गुप्ता सरांच्या ऑफिस मध्ये तिथे वयस्कर गुप्ता सर आणि डाव्या बाजूला दोन इसम बसले होते.
"हाय गुप्ता सर, मी सुधाकर"
गुप्ता नी बसण्याचा केवळ इशारा केला. गुप्ता सारंच चेहरा गंभीर दिसत होता, थोडा वेळ शांततेत गेला. पण नंतर त्या दोन इसमांपैकी एकाने शांततेचा भंग करत सुधाकर ला विचारले.
"अरोरा अँड अरोरा या कंपनीसाठी सध्याचा लोगो तुम्ही बनवला आहे ?"
"हो ! का ? काय झालं ?"
"तुम्ही बनवलेला लोगो हा AroWind Communications या कंपनीची कॉपी आहे, आणि कॉपीराईट ऍक्ट खाली तुमच्यावर गुन्हा नोंद झाला आहे. मी इन्स्पेक्टर जाधव. तुमचा मोबाईल कृपया इकडे द्या".
सुधाकर चा आपल्या कानावर विश्वास बसला नाही, बसणारही नव्हता. डोकं सुन्न झालेल्या धुंदीत त्याने

त्याचा मोबाईल पोलिसांकडे दिला.
पोलीस सुधाकर ला घेऊन गेले.

***

इकडे सुधाकर चा फोन का लागत नाहीये याचा विचार करून करून आलोक, अपूर्वा आणि रश्मी चे डोके चालेना झाले होते, काल संध्याकाळ पासून सुधाकर गायब होता , एवढ्यात आलोक च्या मोबाईल वर रिंग वाजली .

"श्री. आलोक पेंडसे?" पलीकडून आवाज आला.

"हो. बोलतोय,"

"प्रतापनगर पोलीस स्टेशन मधून हवालदार शिंदे बोलतोय, श्री सुधाकर यांना कॉपीराईट ऍक्ट चे उल्लंघन केल्याबद्दल अटक केली आहे, अटकेची वर्दी देण्यासाठी म्हणून मी फोन केला आहे, आरोपीला भेटायचे असेल तर तुमच्याकडे एक तास आहे ".

आलोक जागच्या जागीच स्थब्द झाला. त्याला बाबांचे शब्द आठवले , बाबांनी सांगितल्याप्रमाणे आता सुधाकर वर पुढचे शकत कोसळले होते,
“काय झाले आलोक? ……….. आलोक !!! ” अपूर्वा ओरडली.
“चाला लवकर, आपल्याला निघायचे आहे”
“अरे पण काय झाले ? कुठे जायचे आहे आपल्याला ? सुधाकर ठीक आहे ना ?”
“सुधा ला अटक झालीये.”
“काय ??? अटक ? का ?”
“मला पण माहीत नाही, ते पोलिस स्टेशन वर गेल्यावर कळेल”.

***

पोलीस स्टेशन मध्ये पोहोचताच एका केबिन मध्ये कोपर्यात सुधाकर पाठीमागे हात बांधून उभा राहून काहीतरी सांगत होता, व समोरचा व्यक्ती तो सांगेल तसे टाईप करून लिहून घेत होता. सुधाकर ला अशा अवस्थेत बघवत नव्हते.
ते तिघे एका टेबला जवळ गेले, आणि सुधाकर बद्दल विचारले.

टेबलावर असलेल्या हवालदारानी केस ची सगळी माहिती सांगितली. दोन्ही लोगो कसे मॅच होतात हे पण सांगितले. कॉपीराईट ऍक्ट खाली सुधाकर ला पकडले होते. दोन लोगो मध्ये साम्य बघून आलोक सुद्धा दोन मिनिटे चक्रावला कारण अरोरा अँड अरोरा चा फायनल झालेला लोगो तयार करताना दोघे सोबतच बसले होते, त्याचबरोअबर त्या लोगो मध्ये चेंजेस सुद्धा पुढे आले होते .

पण आता तो विचार करण्यात अर्थ नव्हता , सुधाकर वर FIR दाखल झाली होती, कारण सुरवातीलाच त्याने हा लोगो त्यानेच केला हे काबुल केले होते. स्टेशन मध्ये असलेल्या कॉन्स्टेबल ने दिलेल्या माहिती नुसार उद्या सुधाकर ची कोर्टात पेशी होती. जास्त वेळ ना घालवता अलोक वकिलाच्या खटपटीला लागला.

***

कोर्टाने सुधाकर ला दोन दिवस पोलीस कस्टडी सांगितली. पोलीस स्टेशन मध्ये सुधाकर ला नेत असताना पाच मिनिटे आलोक आणि इतर लोकांना त्याच्याशी भेटता आले.

"वाट लागायचीच असेल तर ती कशी पण लागते, मग त्यात आपली चूक असो व नसो." सुधाकर चे हे शब्द सुई बोचल्याप्रमाणे त्या तिघांच्या काळजात घुसले. कस्टडी मध्ये असताना पोलीस चौकशी दरम्यान दोन लोगो मध्ये असलेले साम्य योगायोग आहे हे हे पटायला पोलिसांना जाड होते, त्यांना वाटत आता असे वाटू लागले होते कि हा आरोपी आपला आरोप काबुल करत नाहीये. बोलायला भाग पाडण्यासाठी त्यांनी सुधाकर वर अनेक प्रकारांनी मानसिक दडपणे टाकली, ना ना प्रकारच्या भीती दाखवल्या , पण सुधाकर सत्याशी प्रामाणिक राहिला. जे केलेच नाही ते काबुल करायला सुधाकर चे मन तयार नव्हते, आणि त्यासाठी अन्वयीत मानसिक छळ त्याच्या वाट्याला आला. कस्टडी मध्ये एक एक मिनिट एका तासा सारखा जातो, चौकशी चालू असते तेव्हा डोंगरा एवढे मानसिक दडपण आणि कस्टडी मध्ये वेळ त्याच्याशी असा खेळ खेळात होता. अशावेळी घडून गेलेल्या घटना डोळ्या समोर आहे तशा उभ्या राहतात, नको नको ते विचार मनात येऊ लागतात, मानाने कमकुवत असलेल्या लोकांची हि कामे नव्हेत. सुधाकर ला जर हे दोन दिवस कसे गेले हे लिहून काढ असे सांगितले असते तर त्याला तो अनुभव कधीच शब्दात उतरवता आला नसता.

***

दोन दिवसाच्या कस्टडी नंतर पुढच्या कोर्टातील पेशी मध्ये सुधाकर ला जामीन मंजूर झाले. कमीत कमी आपला माणूस तरी बाहेर आला असा सुखद विचार सगळ्यांच्या मनात येऊन मनावरचा ताण बराच कमी झाला. आलोक, रश्मी आणि अपूर्वा यांनी सुधाकर ला घेऊन एका रेस्टोरंट मध्ये गेले.
“आलोक ! वाळके बाबांचा काही फोन , मेसेज वगैरे ?” सुधाकर ने पहिलाच प्रश्न विचारला
“नाही ! या गडबडीत कोणाला फोन करता आला नाही, कित्तेक जणांचे फोन मिस झाले आहेत”
“आपण लगेच निघूया त्यांच्याकडे”
हे बाबा कोण आणि त्यांचा काय विषय आहे हे रश्मी आणि अपूर्वा यांना माहीत नव्हता. आणि सुधाकर आणि आलोक ने त्यांना असला भयाणक प्रकार सांगायचे टाळले होते.
"कोण बाबा ?" अपेक्षेप्रमाणे रश्मीचा प्रश्न आलाच.
“अगं काही नाही ते एक ओळखीचे आहेत , ते …” आलोक काहीतरी खोटं सांगत होता
“आलोक थांब , हे संकट आपल्या सगळ्यावर आहे , आणि आतापर्यंत बाबा बोलले त्याप्रमाणे घडले आहे, पुढेही घडेल ! सगळे यांना माहीत हवे, कोणाला अंधारात ठेवण्यात काही अर्थ नाही.” सुधाकर ठाम निशाचयाने बोलल्यावर आलोक चा नाईलाज झाला.
आलोक ने रश्मी आणि अपूर्वा ला सगळा किस्सा सांगितला .
असला कायतर अघोरी प्रकार आपल्या वाट्याला आला आहे ऐकून रश्मी आणि अपूर्वा पूर्ण घाबरल्या.
“जे आहे ते आहे, आपल्याला या प्रकाराला फेस करायचे आहे आणि यातून मार्ग काढायचा आहे, आणि आपल्याकडे दुसरा पर्याय सुद्धा नाही” ….. सुधारक !
"अरे बाबा काय करणार आपण ? सगळं डोक्या बाहेरचं आहे , नंदकिशोर चं काय झालं बघितलंस ना ? संपलं सगळं, आपण सगळे एक तर मारणार , किंवा आपले आयुष्य असेच कोणत्या ना कोणत्या दडपणा खाली जाणार, बरोबर केलं नंदकिशोर ने, काय उपयोगाचं असलं जगणं ?" अपूर्वा ने आपले तोंड दोन्ही हातात झाकून घेतले. कोणाकडे तिच्या प्रश्नांचे उत्तर नव्हते. असल्या अघोरी संकटातून आपली कशी सुटका होणार होती ? नाश्ता उरकून सर्वानी धोंड चा रस्ता धरला.

***

## राज

“तुमच्यापैकी आलोक कोण ?” बाबांच्या घरी पोहोचताच त्यांनी पहिला प्रश्न विचारला. तशी आलोक चा मनात धडकी भरली. आता बाबा माझ्या बाबतीत काय ऐकावे लागेल या धसकीने तो बोलला
“बाबा मी”
“अरे तुला किती फोन केले पोरा”, हुश्श ! एवढचेच होते तर,
“सॉरी बाबा, इथून गेल्यावर सुधाकर ला पोलिसांनी नेले होते, त्याच्या गडबडीत ....”
“असुदे असुदे ! बसा तुम्ही सगळे” असे म्हणून बाबा आत गेले.
"बाबांच्या बोलण्यावरून तरी त्यांच्याकडे आमच्या साठी काहीतरी आहे असे वाटत आहे , फक्त ते चांगलं काहीतरी असुदे, अजून धक्के सहन करायची टाकत आता कोणाच्यातच नाहीये " जास्त ना बोलणारी रश्मी स्वतःहून बोलली.
तेवढ्यात दुसरे एक गृहस्थ सर्वांसाठी चहा घेऊन आले, सुधाकर आणि आलोक ने दोन घोटातच चहा फस्त केला , कारन इतर कुठल्याही चहा पेक्षा हा काहीतरी वेगळा होता.
थोडा वेळ असाच गेल्यावर बाबा आले, हातात एक डायरी होती, आपला जाड भींगाचा चश्मा एका हाताने धरून दुसर्या हाताने बाबा त्या वहीत काहीतरी शोधात होते.
“हा ह्यो काय, मिळाला बरा ! हं …………. हा नंबर लिहून घ्या ”

सुधाकर आणि आलोक ने बाबांनी सांगितलेला नंबर सेव्ह करून घेतला, व आता बाबा आता काय सांगतात याकडे सगळ्यांचे लक्ष होते.
"हा राज चा नंबर आहे, पाच वर्षांपूर्वी माझ्याकडे आलेला, अतिमानवीय कार्याक्षेत्रें अर्थात paranormal activity चा तो त्या वेळी अभ्यास करत होता, वयाच्या पंधरा वर्षांपासून तो या विषयामध्ये अभ्यास करत आहे, सध्या तो कुठे असतो माहीत नाही. पण मला खूप शोधल्या नंतर एका भानामतीच्या त्रस्त झालेल्या व्यक्ती कडून राजाचा नंबर मिळाला. या गोष्टीचा अभ्यास करत करत आता तो स्वतः: एक मांत्रिक बनला आहे, मला विश्वास आहे कि याची तुम्हाला काही ना काही नक्की मदत होईल." बाबांनी आपले वाक्य पूर्ण केले.
सुधाकर च्या डोक्यात विचार येऊ लागले…. ‘एक मांत्रिक, ज्याचे नाव राज आहे, हे पचायला जरा जड आहे, पण परिस्थिती अशी होती कि परिस्थिती जिकडे नेईल तिकडे जावे लागते आणि जसे नेईल तसे जावे लागते, तेथे तुम्हाला तुमचा चॉईस नसतो.
सर्वानी बाबांचे आभार मानले. पण ज्या परिस्थिती मध्ये आपली म्हणवणारी मानसे आपले खरे रंग दाखवतात व आपल्याकडे पाठ फिरवतात अशा वेळी नि:स्वार्थ मदत करणाऱ्या बाबांसारख्या खेडुताचे आभार कोणत्या शब्दात मानणार? बाबांकडे नि:संशय काहीतरी सिद्धी होती, आणि ती व्यक्ती किती महान असेल जी अशा सिद्धीचा वापर स्वात:च्या स्वार्था साठी न करता लोकांसाठी करत होता. नाहीतर आपण जगात चार अर्धवट पुस्तके वाचून अर्ध्या हळकुंडाने पिवळे होऊन स्वात:ला जगापासून वेगळे म्हणून मिरवणारे हजारो लोक बघतो.’
विचारामच्या नादात रास्ता कधी संपला कळाले नाही . सर्वजण सुधाकर च्या रूम वर आले.
"सुधा तू फ्रेश होऊन घे, मी राज ला फोन करतो " आलोक बोलला .
“राज 'मांत्रिक' का ?” रश्मी चेष्टेचा सुरात बोलली तसे सर्वांच्या चेहऱ्यावर हसू फुटले. खरेतर बाबांना भेटून आल्यामुळे डोक्यावरचा ताण थोडा कमी झाल्यासारखा वाटत होता.

***

"हॅलो हॅलो , मिस्टर राज ? "
"हॅलो क्या मेरी बात राज सर से हो राही है ? "
सुधाकर फ्रेश होऊन बाहेर आला तेव्हा आलोक मोबाईल शी अशाप्रकारे झगडत दिसला.
“शिट्ट यार, परत कट झाला”
“अरे पण तू हिंदी मध्ये का बोलत आहेस ? राज ला मराठी येत नाही का ?” सुधाकर.
“अजून त्याच्याशी बोलणे नाही झाले, फोनच लागत नाही, लागतोय पण नीट आवाज येत नाही. समोरचा काय बोलतोय ते काळात नाहीये” आलोक पुढे बोलू लागला “हा एकाच पर्याय आहे आपल्याकडे हा फेल गेला की आपल्या समोरचे सगळे रस्ते बंद.”
“थोड्या वेळात परत ट्राय करू ,डोन्ट वरी” सुधाकर.
एवढ्यात आलोक चा फोन वाजला. राजाचा रिटर्न कॉल आलेला.
“हॅलो राज सर ?” अलोक
“हा ! राज भैया थोडे कामात आहेत, आपण ?” पलीकडून आवाज आला
“सर मी आलोक, नांदवाळ मधून बोलतोय, धोंड गावाच्या वाळके बाबांकडून राज सरांचा नंबर मिळाला, एका विषयासंबंधी बोलायचे आहे.”
“बरं बरं असं का, मी तुमचा निरोप देतो राज भैया ना, ते तुम्हाला फोन करतील.”
“सर आपण ?”
“मी बबन, राज भैयांसोबत असतो. मी सांगतो , तुम्ही काळजी करू नका...” पलीकडच्या व्यक्तीने फोन कट केला, बहुतेक ते लोक ड्रायविंग करत असावे असे आलोक ला वाटले.
“काय झाले ?” अपूर्वा.
"राज बिझी आहे, थोडया वेळाने कॉल करेल".

***

“साधारण आजचा सगळा दिवस राजच्या फोन ची वाट बघण्यात जाणार बहुतेक.” सुधाकर वैतागून बोलला.
“हा एकाच दुव्यावर आपली आशा आहे, दुसरे काही सुचत पण नाहीये, आपल्याला अजून हे पण माहीत नाही की हा राज नामक मांत्रिक आपली मदत करू शकेल की नाही.” आलोक.
“ते बोलल्यावरच कळणार आपल्याला”… सुधाकर !
कोणी घरी जायच्या अवस्थेत नव्हते. राहून राहून कधी एकदा राज नामक व्यक्तीचा फोन येतोय असे वाटत होते.
रात्रीचे नऊ वाजायला आले असताना रश्मी आणि अपूर्वा लागल्या. आलोक कोच वर पाहुडाला होता, व नकळत त्याला लागलेली डुलकी फोन च्या रिंग ने मोडली .
‘Calling RAJ…’
अशी स्क्रीन मोबाईलवर वर दिसता आलोक चा दिवसभराचा शीण निघून गेला, त्याने पटकन फोन रिसिव्ह केला.
“हॅलो मिस्टर राज ?” आलोक.
“नमस्कार ! हो राज , मगाशी मी माझ्या कामात व्यस्त असल्याने तुझाशी बोलता आले नाही, त्याबद्दल क्षमस्व, वाळके बाबांचे नाव ऐकले त्यामुळे इतक्या रात्री मी ना राहून तुला फोन केला, नाहीतर मी तुझ्याशी उद्याच बोलायचा विचार करत होतो.” राज बोलला.
‘अजून एक शब्द ही ना बोलता हा मानूस आपल्याशी असं बोलत आहे जसं कि की किमान चार पाच वेळा आपलं भेट झाली व आपल्यावर काय संकट ओढावले आहे हे याला माहीत आहे’ आलोक ला

आश्चर्य वाटल्यावाचून राहिले नाही.
“सर खूप खूप धन्यवाद आम्हाला वेळ दिल्याबद्दल. मला तुमच्याशी एक विषय बोलायचा आहे, तर कृपया आपण कधी फ्री आहात सांगा , जेणेकरून आपल्याला मला सविस्तर येईल.”
“आताच बोल ना, फ्री”
“ओके मी लाऊड स्पीकर वर ठेवतो, माझ्यासोबत माझा मित्र सुधाकर , रश्मी आणि अपूर्वा आहेत,”
“ओके. ...”
सुधाकर आणि आलोक ने सुरवातीपासून काळापर्यंत सगळी स्टोरी राज ला सांगून टाकली.
“ठीक आहे , तुम्ही मला जे काही सांगितले, त्यात ज्या काही घडल्या डेट वाईज लिस्ट करा. अगदी छोट्या मोठ्या घटना सुद्धा त्यात येऊदेत.” राज.
“ओक्के आहे राज सर, तुम्ही म्हणाल त्याप्रमाणे आम्ही लगेच कामाला लागतो, पण हे संकट ?” आलोक.
“आलोक, घाबरू नका, प्रत्येक गोष्टीला मार्ग आहेत आणि पर्याय आहेत, आपण एक तर ती गोष्ट स्वीकारत नसतो , स्वीकारली तरी मार्ग शोधात नसतो, सगळे प्रॉब्लेम आपल्या मध्ये असतात, फक्त ते आपण मान्य करत नाही.” राजाचे हे बोलणे सध्या तरी कोणाला समजण्या सारखे नव्हते , ते लक्षात येऊ नये म्हणून, सुधाकर ने विषय बदलला.
“सर ते 'खविस' वगैरे आमच्या मागे आहे , त्याचे टायमिंग जे वाळंगे बाबा आम्हाला बोलले होते, काय प्रकार आहे ? " सुधाकर.
“काळातील, सगळ्या प्रशनांची उत्तरे तुम्हाला आपोआप मिळतील. घाबरून जाऊ नका, असले प्रकार फेस करणारे तुम्ही एकटे नाहीत, यांच्या पेक्षाही भयानक गोष्टी ना सामोरे जाऊन लोक आज स्टेबल आयुष्य जगात आहेत. फक्त समोर जी परिस्थिती येईल तिला घाबरन आणि खचुन न जाता धैर्याने सामोरे जा, कोणताही खविस किंवा भूत तुमचे काही वाकडे करू शकणार नाही, आता फोन ठेवतो, मी सांगितल्याप्रमाणे तुम्ही तशी लिस्ट काढा दोन दिवसानी मी नांदावाळ ला येईन तेव्हा भेटू .”
“सर ! आपल्याला कोणत्या शब्दात धन्यवाद देऊ काळात नाहीये ...” सुधाकर.
“धन्यवाद वगैरे फॉर्मॅलिटीज पेक्षा यातून बाहेर कसं पडायचं याकडे लक्ष द्या , चालो बाय !”
“बाय सर”
“डोन्ट कॉल मी 'सर', माय नेम इज राज”
“ओके राज , बाय, अँड थॅन्क यु सो मच !”
राज ने फोन ठेवला. राज शब्दांनी सर्वांना लोकांना खूप धीर दिला. खूप महिन्यांनी सगळे जण आज मनासारखे जेवले. आलोक आणि सुधाकर ने रश्मी व अपूर्वा ला घरी सोडले व दोघे सुधाकराच्या घरीच थांबले. उद्या सकाळी लिस्ट काढण्यासाठी पुन्हा बरोबर आकारा वाजता जमायचे ठरले.

***

सकाळचे आकारा वाजले होते, सगळे जण एकत्र जमले, सुरवातीला प्रत्येकाने आपापली लिस्ट प्रिपेअर करायची व आणि सगळ्यांचे झाल्यावर एकत्र अशी फायनल लिस्ट तयार करायची असे ठरल्याप्रमाणे सगळे हातात वही आणि पेन घेऊन कामाला लागले. खूप दिवसा नंतर नको असलेल्या विषयाशिवाय काहीतरी वेगळा विषय घेऊन कामाला सुरवात झाली होती, आपली या संकटातून सुटका होईल या छोट्याशा आशेने सगळे मनापासून काम करत होते. चांगले चार पाच तास प्रत्येकाने डोके घासून आपापली लिस्ट तयार केली, आणि त्याच्या नंतर सगळयांनी एकत्र बसून एकत्रित अशी एक वेगळी लिस्ट बनवली. त्यात जवळ जवळ सगळ्या घटना कव्हर झाल्या होत्या चांगल्या वाईट लहान मोठ्या , काही शिल्लक राहिले नाही याची खात्री झाल्यावर अलोक ने राज ला लिस्ट रेडी झाली असल्याचा मेसेज केला.

तिसर्या मिनिटाला त्या मेसेज ला रिप्लाय आला, ती लिस्ट आमुकी आमुक या मेल आयडी वर स्कॅन करून पाठवून द्या असे त्यात म्हटले होते. आलोक ने लगेचच लिस्ट मेल करून दिली आणि तसा मेसेज करून ठेवला.
इकडे राज ने त्याच रात्री आलोक ने पाठवलेल्या लिस्ट चा अभ्यास करायला सुरवात केली, रात्री जागून कोणत्या तरी विषयात डोक खुपसून बसने हा त्या चा आवडता उद्योग. लिस्ट वर वर बघितल्यावरचा त्याला काही गोष्टी क्लियर झाल्या होत्या, आता तो या प्रकाराच्या खोलात जाऊन एक एक घटनाचा अभ्यास करत होता. त्याला आजच हे काम संपवायचे होते कारण उद्या सकाळी तो नांदावाल ला रवाना होणार होता .

***

सकाळी निवांत चालणार होते, पण राज नि पहाटे चार वाजता निघायची गडबड का केली हे बबलू ला कळाले नाही. बबलू राज चा सहकारी, राज च्या सगळ्या अभ्यासामध्ये तो त्याची मदत करतो. आज राज झोपणार नाही हे त्याला माहीत होतं. नक्कीच वर वर साधं वाटणारं सुधाकर आणि आलोक चं प्रकरण तेवढंच क्लिष्ट असणार हे राज च्या गडबडीवरून बबलू च्या लक्षात आले होते.

पहाटे आवरून धुराचा लोळ उडवत राज ची गाडी नांदावाल च्या दिशेने निघाली. गाडी बबलू चालवत होता व बाजूला राज मनातल्या मनात काहीतरी गणिती आकडेमोड करत बसला होता.

***

"आलोक अरे उठ , उठ लवकर ! राज कधी पण पोहोचेल, त्याचा आताच फोन आलेला, उठ आवर. "

"काय ? आता ? तो तर .... "

"हो, पण तो पोहोचेल कधी पण आवरून घे , मी रश्मी आणि अपूर्वा ला बोलावून घेतो करतो "

तासाभरात रश्मी आणि अपूर्वा सुधाकर च्या घरी येऊन पोहोचल्या . आलोकचे सुद्धा आवरले होते. आता सगळ्यांचे डोळे राज कधी येतोय यांच्याकडे लागले होते.

तेवढ्यात सुधाकर चा फोन वाजला

"सुधाकर, आम्ही सिंधू चौकाच्या कमानी जवळ आहोत, गाडी इथून कुठे घेऊ ?"

"एक काम करा, तुम्ही तिथेच थांबा, मी दोन मिनिटात तिथे येतो न्यायला ", एवढे बोलून सुधाकर ने फोन कट केला.

"ये ! मी राज ला घेऊन येतो .. थांबा इथेच .. "

"सुधा , मी सुद्धा येतो तुझ्या सोबत " आलोक बोलला

"चल "

दोघे आपल्या टू व्हीलर नि सिंधू चौकात पोहोचले, तिथे एक MH ११ - ११११ या नंबर प्लेट ची शुभ्र रंगाची इनोव्हा उभी होती, बघितल्यावरच सुधाकर ने हि गाडी राज ची आहे हे ओळखले, त्या इनोव्हा च्या

बाजूला गाडी नेवून थांबवली.

गाडीतून दोन व्यक्ती बाहेर आल्या. 'मांत्रिक' या शब्दाला साजेश्या नसलेली ती दोघं होती, त्यापैकी एक ड्राइवर च्या सीट वर बसलेला व्यक्ती केस थोडे वाढलेले भरदार मिशा, अंगाने हट्टा-कट्टा असा साधारण पस्तीशीचा तो युवक जी होता . आणि दुसरा ना कमी ना जास्त असा माध्यम बांध्याचा , रंग सावळा केस वरच्या बाजूला ओढलेले शुभ्र रंगाचा शर्ट हातात एक छोटीशी रुद्राक्षाची माळ , दोन्ही भुवयांमध्ये किंचित न समजण्या इतका गंध लावलेला, आणि सर्वात महत्वाचे म्हणजे तीक्ष्ण डोळे, त्याच्या कडे बघताच हाच राज असावा याची खात्री पटली.
“हॅलो मिस्टर राज ?” सुधाकर हस्तान्दोलनासाठी हात पुढे केला
“धन्यवाद”
“धन्यवाद कशासाठी ?”
“मला 'मिस्टर' बोलल्या बद्दल,”
सुधाकर आणि आलोक बुचकळ्यात पडले..
हे ओळखून राज पुढे बोलला ..

"अरे लोक मला नको नको ते संबोधतात , मांत्रिक , तांत्रिक, ..... तुमच्याकडून मिस्टर ऐकले आणि जरा माणसात असल्यासारखे वाटले " आणि चौघांमध्ये खासाखास पिकली.
“चला निघूया , आपल्याकडे जास्त वेळ नाहीये”
"हो हो चला"
चौघे सुधाकर च्या रूम वर पोहोचले, रूम चा जिना चढतानाच राज च्या कपाळावर एक सूक्ष्म आठी पडली, काहीतरी शोधात असल्याचा भाव त्याच्या ठिकाणी दिसत होता. घरी येताच आलोक ने सगळ्यांची ओळख करून दिली, पण राज चे या फॉर्मल गोष्टीकडे लक्ष नव्हते, असे वाटत होते कि त्याचे तिक्ष्ण डोळे काहीतरी शोधात आहेत.
“सुद्धाकर हि रूम कोणाची ?” आल्या आल्याच पहिला प्रश्न , म्हणजे बाकीचे काही चर्चा नाही ना चहा नाश्टा वगैरे , राज ने सरळ विषयाला सुरवात केली.
“सर माझी” सुधाकर
“माल सगळी रूम दाखव” राज उठून उभा राहिला.
“हो सर, या...” असे म्हणत सुधाकर ने राज ला बेडरम मध्ये आले.
ते दोघे परत आले तेव्हा राज सुधाकर ला विचारात होता.

"रूम एवढीच आहे ना ?"

"हो सर."

"स्टोअर रूम , गेस्ट रूम अशाप्रकारची एखादी खोली किंवा माळा वगैरे नाही ना इथे ?"

"नाही सर एवढ्याच पाच खोल्या , एवढ्यातच मी राहतो "

" ठीक आहे, तर "
“आता आपल्याला एक काम करायचे आहे , आपण आधी आलोक च्या रूम वर जाऊ, मला त्याची रूम बघायची आहे . त्याच्यानंतर नंदकिशोर च्या व तेथून तुम्ही सगळे जिथे बसून काम करत होतो, त्या तुमच्या ऑफिस वर.” राज.

“सर पण एक प्रॉब्लम आहे” आलोक अडखळत बोलला.
“काय ?”
“सुधाकर ला अटक झाली होती तेव्हा आमचे ऑफिस पोलिसांनी सील केले आहे, आपल्याला आत जाता येणार नाही.” आलोक
“ह्म्म !!” असे म्हणून राज थोडा वेळ मान खाली घालून विचार करत बसला,त्याच्या कपाळावरच्या आठ्या अजून दाट झाल्या.
“असो, आधी जेवढे आपल्या हातात आहेत तिथे तरी जाऊया , ऑफिस चे नंतर बघू” राज बोलला.
“सर ! आपण प्रवासावरून आला आहात चहा नाश्टा वगैरे ?” आलोक
“मित्रानो, तुम्ही कोणत्या परिस्थिती मधून जात आहात याची कल्पना असताना तुम्हाला असा औपचारिकतेचा त्रास देणे मला पटत नाही, हो खोटे कशाला बोलू थोडी भूक लागली आहे, पण बाहेर खाऊया आपण तुम्ही त्रास नका करून घेऊ”
“सर, आम्ही कुठले कोण माहीत नसतानाहि ....”
“अं हं!” राज ने सुधाकर ला मध्येच तोडले आणि पुढे बोलू लागला “तुमच्यावरच संकट नष्ट झाले कि आपण मला पार्टी द्या मग तर झालं ? ”.
राज शि काय प्रतिवाद करावा कोणालाच कळेना , शेवटी सगळे , सुधाकर च्या रूम वरून निघाले . आलोक च्या रूम वर पोहोचल्यावर सुद्धा राज ने आलोक ला सगळी रूम दाखवायला लावली. सगळी रूम फिरून झाल्यावर सोफ्यावर . लगेचच नंदकिशोर च्या रूम वर पोहोचले. तिथे पण तोच प्रकार. या वेळी मात्र राज आपली नाराजी लपवू शकला नाही, बहुतेक त्याला जे पाहिजे होते ते मिळाले नव्हते असे दिसत होते . आता शेवटी राहिले एकाच ठिकाण , ते म्हणजे ऑफीस ची जागा.
“चला, तुमच्या ऑफिस च्या जागेत जाऊ ! ” असे म्हणत राज उठला.
सगळे बिऱ्हाड ऑफिस ज्या ठिकाणी आले . राज ने बघितले,एक मोठे कुलूप असलेला बंगला, समोर आंगण टाईप मोकळी जागा , सभोवती सिमेंट च्या विटांची तटबंदी. सगळी जागा राज न्याहाळत होता. त्यावेळी त्याच्या कपाळावर दाट आठी पडली होती, आणि त्यात त्याचे अति-भेदक डोळे, समोरून साधा सुद्धा दिसणारा मनुष्य नक्कीच काहीतरी विशेष ताकतीचा असला पाहिजे अशी कोणाचीही खात्री झाली असती.
वादग्रस्त जागेत कोणीतरी आले आहे हे समजताच आजू बाजूचे लोकी जमा झाले होते ... काही लोक खिडक्या आणि दरवाज्यात उभारून काय घडतंय हे मोठ्या उत्सुकतेने पाहत होते.
“या तटबंदीच्या पलीकडे काय आहे ?” राज इथे आल्यावर प्रथमच काहीतरी बोलला होता ...
“पलीकडे ओढा आहे”
सुधाकर चे वाक्य ऐकताच राज ची नजर आर्चर्याने सुधाकर कडे गेली. त्यावेळी त्या नजरेत आश्चर्य युक्त "काय ?" असा आशय सामावलेला होता.
राज काहीच ना बोलता त्या दिशेने निघाला, त्या ओढयाकडे एकदा नजर टाकली, व परत आला. आपला मोबाईल काढला व कोणाला आपले बोलणे ऐकायला जाणार नाही अशा ठिकाणी गेला ...
हा सगळा प्रकार बघून या जागेतच काहीतरी गोची आहे हे सगळ्यांच्या लक्षात आलो होते . कारण इतर ठिकाणी राज विनाकारण एक मिनिट सुद्धा थांबला नव्हता.
राज परत आला वर पुन्हा त्याचिउ नजर कधी त्या बंगल्यावर कधी बाजूच्या मोकळ्या जागेत कधी ओढ्याच्या बाजूला कधी टेरेस वर .. असा खेळ साधारण पाच ते दहा मिनिटे चालला होता, तेवढ्यात पोलिसांची गाडी येताना दिसली. त्यामधु एक हवालदार खाली उताराला आणि सरळ राज च्या दिशेने चालून आला, त्याने राज च्या हातात चावी दिली आणि हस्तआंदोलन केले आणि निघून गेला. राज ने चावी बबलू च्या हातात दिली, तशी बबलू ने बंगल्याच्या दरवाजा उघडला. पहिला राज ने बाहेरूनच आतमध्ये डोकावून पाहिले, नंतर तो आत गेला , त्याच्या पाठीमागून सुधाकर व आलोक सुद्धा आत गेले, रश्मी

आणि अपूर्वा ची आत जायची हिम्मत होत नव्हती. आतमध्ये राज एका एका गोष्टी वरून नजर फिरवत होता, त्याच्या हातामध्ये असलेली रुद्राक्षाची माल एक के मणी खाली सरकत होते, बहुतेक तो कसला तरी जप करत असावा. आधी हॉल मध्ये राज घुटमळला,नंतर किचन , त्याचा नंतर बेडरूम ची रोम तिथे पण दोन लॅपटॉप्स लावले होते, नंतर बाथरूम , मग टेरेस, .. अशी एक एक ठिकाणे राज पिंजून काढत होता, एक आणि एक कोपरा राज ने पाहून घेतला आणि शेवटी परत हॉल मध्ये आला. हॉल मध्ये बरोबर मधोमध एक टीपॉय होता, त्या टीपॉय कडे हात करत त्याने बबलू कडे पाहिजे, तसे बब्बू पुढे झाला व तो टीपॉय काढून त्याने सरळ ऑफिस च्या बाहेर नेवून ठेवला . . त्यानंतर त्या हॉल मध्ये अडगळ असलेल्या दोन तीन गोष्टी त्याने अशाचप्रकारे बाजूला केल्या. व शेवटी बाहेर आला. पुन्हा थोडे लांब गेला, कोणाला तर फोन केला व परत बंगल्याच्या समोर असलेल्या मोकळ्या जागेत आला. पाच मिनिटे अशीच गेल्यावर त्याने मौन सोडले, सुधाकर व आलोक कडे मोर्चा वाळवून बोलायला सुरवात केली.
“सुधारकर, आलोक... तुम्ही या काही दिवसात एवढे सहन केले आहे कि तुमचे हृदय आता कठीण झाले आहे, आणि यापुढेहि जर काही अभद्र प्रकार पाहायची वेळ आली तरी तुम्ही डगमगणार नाही याची मला खात्री खात्री आहे. आपल्याला एक काम करायचे आहे, दोन तीन कुडाळ आणि फावडे यांची व्यवस्था करा आणि तुमच्या विश्वासातल्या दोघा तिघांना बोलावून घ्या.”
राज ने आपला मोर्चाचे बबलू कडे वळवला. आणि तो त्याच्या कानात काहीतरी खुसपुसु लागला .
“जे सांगितले आहे ते सगळे आणि त्याच प्रमाणात आन.” राज बबलू ला.
“हो भैया ! ” असे म्हणून बबलू तिथून निघाला.
एवढ्या वेळेत मगाशी चावी देऊन गेलेला पोलीस परत येताना दिसला.
“सर्जेराव , तुम्ही इथेच थांबा, इथे जो काही प्रकार होईल तो तुमच्या समक्ष झाला पाहिजे. कारन पोलिसांनी सील केलेल्या जागेत पोलिसांच्या अनुपस्थितीत आम्ही काही करू इचछीत नाही.” राज त्या पोलिसांकडे बघून बोलला
“जी राज भैया” एका पोलिसाला इतक्या नम्रतेने बोलता बघून सुधाकर ला आशचर्य वाटल्यावाचून राहिले नाही, कारण एका आठवड्यापूर्वी याच पोलिसांना त्याने त्यांच्या उग्र अवतारात पाहिले होते.
सुधाकर , अलोक रश्मी व अपूर्वा चाललेल्या प्रकाराने पूर्ण गोंधळून गेले होते . काय चालू आहे काही काळात नव्हते पण राज चा एकूण पवित्रा बघून सर्वांनाच समाधान वाटत होते, कारण काहीतरी होणार होते हे नक्की.

याच समाधानात सुधाकर व अलोक ने दोघा तिघांना फोन केले..
काहीतरी आणायला गेलेला बबलू , सुधाकर आणि आलोक चे मित्र यायला अजून वेळ लागणार होता .
“सुद्धा ! चाल जरा भटकून येऊन” राज बोलला
“हा चला ना , कुठे जायचे आहे ?”
"आधी चाल तर खरं "
सुधाकर ने आपल्या गाडीला किक मारली, मागे राज बसला...

राज ने त्या घरापासून पाच मिनिटांच्या अंतरावर असलेल्या एका पानाच्या टपरीवर गाडी थांबवली,
“डु यु स्मोक ?” अनपेक्षित प्रसन्न सुधाकर ला राज ने विचारला.
“या आय डू”
राज ने दोन सिगारेट घेतल्या. एक सुधाकरल ला दिली, आणि सिगारेट चे कश मारत तो कसला तरी गहाण विचारात बुडाला आहे हे सुधाकर ला लक्षात आहे, तेव्हा त्याने त्याच्या मनात पडलेल्या संख्या प्रश्नांना सध्या तरी तसेच दाबून ठेवणे उचित समजले.

***

राज व सुधाकर येत होते, जागेवर बबलू येऊन समोरच्या झाडाखाली बसला होता, आलोक शी कोणीतरी तिघेजण नवीन लोक बोलत होते, आणि आता बघ्यांची गर्दी पूर्वी पेक्षा दात झाली होती, आपण काय करत आहोत हे बघण्यासाठी एकवढे लोक कशासाठी जमा झाले आहेत हा प्रश्न सहाजिकच आलोक आणि सुधाकर ला पडला होता, पण त्यांना हे काळात नव्हते कि या जागेत काय आहे हे सुधाकर व आलोक ला माहित नव्हते पण आधीपासून तिथे राहणाऱ्या लोकांना माहित होते. आणि कोणी मांत्रिक तिथे आलाय म्हटल्यावर गर्दी होणे साहजिक होते. पण सध्यातरी या प्रश्नाला इतके महत्व द्यायचे कारण नव्हते.
राज जागेवर येताच आलोक ने नवीन चेहऱ्यांची ओळख करून दिली, ते आलो आणि सुधाकर चे मित्र अनिल, प्रदीप व अजमल होते.
राज या अनिल, प्रदीप व अजमल , सुधाकर व आलोक ला एका बाजूला घेऊन गेला, बबलूला इकडे येण्याचा इशारा केला व हवालदार सर्जेराव ना हाक दिली . सगळे राज च्या भावतीने जमल्यावर त्याने बोलायला सुरवात केली .
“मित्रानो ! आता आपण कामाला सुरवात करूया , आपल्या आता या बंगल्याच्या हॉल मध्ये कुडळ आणि फावडे घेऊन ठराविक ठिकाणी खोदायचे आहे , पण कामाला सुरवात करण्या आधी. आलोक , या पोरींना घरी पाठवा, आपल्यापैकी कोणी हार्ट पेशंट असेल तर इथे थांबू नका,
सुधाकर जमलेल्या लोकांना इथून पांगले पाहिजे. आणि हे सगळ्या झाल्यावर सुधाकर आलोक आणि तुम्ही तिघे खोदकामाला सुरवात करूया. ”
“घाबरत नाही ना रे भुताला ?” राज ने मोठ्या मजेशीर पणे व हसत हसत प्रश्न विचारला, जेणेकरून आतापर्यंत डोक्याला जो ताण आला होता तो निवळावा.
बाकीच्यांनी सुद्धा तितक्याच मिश्किलीने ‘नाही’ असे उत्तर दिले, पण भूत म्हटल्यावर पोटात भीती होती , पण राज सोबत होता म्हणून काय वाटणार नव्हते.
"ओके चला मग "
तसेच अलोक ने अपूर्वा आणि रश्मी ला घरी जायला सांगितले. का कु करत त्या अनिच्छेने तिथून निघाल्या. सुधाकरने मोकळ्या जागेत जाऊन असे काय हाव भाव केला कि जमलेल्या लोकांना वाटले कि 'आजच्या पुरते एवढे पुरे आहे आता हे लोक निघाले आहेत ' त्यामुळे काही लोकांनी तिथून काढता पाय घेतला व तांना बघून आणखी काही लोक तिथून पसार झाले.

***

## खुदाई

जमलेले लोक बर्यापैकी गेले होते हे बघून राज पुन्हा बंगल्यात गेला, हॉल मधील जमिनीकडे एक ताक बघू लागला, कधी उजवीकडे कधी डावीकडे असे फिरत होता. राज ने बबलू कडे इशारा केला तसे बबलूने एक खडू त्याच्या हातात दिला. राज ने एक खून केली व थोडे पुढे सरकला तिथे पण तसेच . असे करण्यात जवळ जवळ अर्धा तास गेला वर सगळ्यात शेवटी खडूचे एक वार्तोल तयार झाले होते, चांगले दोन हात एवढे मोठे. त्याने पुन्हा बबलू कडे पाहिले, तसे बबलू ने एक कुपी त्याच्या हातात दिली, त्या कुपी मध्ये असलेले पाणी त्याने त्या वर्तुळातील जागेवर शिंपडले, या सगळ्या प्रकारामध्ये राज च्या हातातील माळ कंटिन्यू सरकत होती.
"या सगळे " राज ने सगळ्यांना आत बोलावले.
“हे जे वर्तुळ दिसतेय, त्या जागेत खोदायचे आहे, जोपर्यन्त काही सापडत नाही तोपर्यंत खोदायचे. आलोक सुधाकर, आजून कोणाला बोलावणार असाल तर बोलावा कारण आपण किश खाली जाणार आहोत माहीत नाही. पण याठिकाणी नकीच काहीतरी अभद्र दडलेलं आहे. जे बाहेर आल्याशिवाय

राहणार नाही, पण जे काही बाहेर येईल त्याला अजिबात घाबरू नका, तोंडात देवाचे नाव घेत एक के घाव घाला. करा सुरवात."
खोदणाऱ्या पाच जनांपैकी भाबरणारे कॅन्वा भेदारनारे कोणी नव्हते, अनिल, प्रदीप व अजमल तिघे चांगले उमदे उत्साही आणि मित्रासाठी वेळ प्रसंगी जीव पण द्यायला कमी करणार नाही असे तरुण होते, सुधाकर आणि आलोक यांना आज कमालीचा उत्साह आला होता, ज्या प्रकाराने आपल्याला इतका त्रास दिला तिचा अंत करण्यात आपला हातभार लागणार आहे, केवळ या एका विचाराने त्यांच्यातले सगळे भय पळून त्याची जागा आता भलत्याच उत्साहाने घेतली होती.

एक एक घाव पडू लागले, माती पडू लागली, माती बाहेर नेवून टाकण्याचे काम बबलू करत होता, राज ची तीक्ष्ण नजर एक ताक त्या तयार होत असलेल्या खड्ड्याकडे होते, त्याच्या पापण्या कधीतरीच लावल्या जात होत्या.
बाहेर सूर्य मावळतीला चालला होता, संध्याकाळचे साडे सहा वाजले होते. काम चालू करून खूप वेळ झाला, जवळ जवळ अर्धा माणूस इउभा राहिल एवढा खडडा पडला पण अजून त्यातून काही बाहेर आलेलं नव्हतं. सकाळपासून कोणी काही खालं नव्हतं. आणि आता एवढे श्रम केल्यामुळे सपाटून भोकी लागली होती, त्यामुळे सरळ जेवून परत यायचे ठरले.
चांगले पोटभर जेवून सगळे तासाभरात परत आले व पुन्हा जोमाने कामाला सुरवात झाली...
रात्र चांगलीच पडली होती, वेळ जास्त झाला नव्हता, पण बंगला एका कडेला , कोणीतरी वाळीत टाकल्या सारखा असा होता, गटयाच्या बाजूला ओढा आणि ओढ्याच्या हि बाजूला फक्त आणि फक्त झाडी होती, त्यामुळे रात्र चांगलीच जाणवत होती.
पुन्हा घणावर घाण पडू लागले, माती पसरू लागली, खोदकाम करणाऱ्यानच्ये मोठा मोठ्याने होत असलेले श्वाच्छोश्वास आणि जमिनीवर पडत असलेले घाव बाजूच्या शांततेचा भंग करीत होते. रात्र होईल तशी वातावरणात गंभिरता व भयाणता पसरू लागली, खुप वेळ झाला,अजुन तरी काही सापडले नव्हते. चांगला एख माणूस सहज उभा राहू शकेल एवढा मोठा खड्डा पडला होता, जसजसा वेळ जाऊ लागला तशी या ठिकाणी काही सापडेल अशी आशा हळू हळू कमी होऊ लागली, सुरवातीचा उत्साह आता ओसरू लागला. जर आज ज्या दिशेने आपण चाललो आहोत,त्या दिशेने निकाल नाही लागला तर एकमेव असलेला आशेचा किरण मावळार होता, आणि पुढे काय होईल याची सुधाकर आणि आलोक ला कल्पना सुद्धा करता आली नसती. या सगळ्या प्रकारात राज मात्र अजुन स्थिर होता, त्याची नजर अढळ त्या पडत असलेल्या खड्ड्यावर होती. सुधाकर च्या आवाजाने त्याची तंत्री भंग पावली.
"राज !"
राज सुधाकर प्रश्नार्थक नजरेने नजर टाकली.
"राज! मला नाही वाटत इथे काही सापडेल..! अजुन…."
राज ने इशार्यानेच सर्वाना खड्ड्याच्या बाहेर यायला सांगितले व आपण आत गेला. त्याने बबलु कडे काही इशारा केला तसा बबलू ने एक वेगळी कुपी राज कडे दिली, राज ने त्यातील पाणी खाली जमिणीवर शिंपडले, काय झाले काहीत नाही पण राज तसाच ताडकन उभा राहीला व बाहेर आला, व काही न बोलता सर्वाना परत खोदण्याचा इशारा केला.
आपण जवळ आलो आहोत हे कळायला बाकिच्याना वेळ लागला नाही
बबलु कडे पुन्हा काहितरी इशारा केला, तसा बबबु बोलला की
"जरा दमाने, हळू हळू घाव घाला, हवे तर कोणीतरी एकटाच आत राहुदे, बाकीचे बाहेर या"
अजमल ने बाकिच्यांना जायला सांगितले, व एकटा हळू हळू छोट्या कुदळीने मातिचे थर उपसू लागला.
राज खुदाई चालू झाल्यापासुन एक शब्दही बोलला नव्हता. जवळ जवळ अर्धा तास अजमल एकटा खोदत होता, आणि एकाकी राज ने अजमल ला थांबण्याचा इशारा केला. अजमल ने काम थांबवले. व

काही सापडलेय का हे पाहण्यासाठी पुन्हा पुन्हा खाली बघु लागला , परंतु त्याला काही आढळले नाही, अजमल ला राज ने वर यायचा इशारा केला.
राज दोन मिनिटे तसाच उभा होता. त्याच्या मनात काय चालले होते याचा अंदाज लावने कठीण आणि सामान्य लोकांच्या डोक्याच्या बाहेर असे. राजे ने बबलु कडे परत काहीतरी इशारा केला . बबलू ने तात्पुरते आणलेले सगळे बल्ब्स चा रोख खाली खड्ड्याचा तळाशी केला. तसा राज आत घुसला आणि अजमल ने ठेवलेली कुदळ एका विशिष्ठ ठिकाणी मारुन काहितरी उकरुन काढू लागला. हो ! नक्कीच ! काहीतरी सापडले होते ! नेमके काय ते कळत नव्हते पण काहीतरी ठोस होते एवढे नक्की, सगळे बब्ल्स एकत्र करुन सुद्धा वर उभ्या असलेल्याना तळाशी असलेल गोष्ट स्पष्ट दिसत नव्हती, ने सापडलेली गोष्ट व्यवस्थित उकरुन घेतली व बबलू कडे इशारा केला, तसा बबलू ने एक रिकामं पोतं व हातमोजे राज कडे दिले, राज ने ते हातमोजे हातावर चडवले व त्या हातानी ती सापडलेली गोष्ट पोत्यात भरली व बाहेर आला तो सरळ अंगनात गेला. रिकाम्या जागेच्या मधोमध ते पोतं त्यानं ठेवलं. मगाची कुपी घेवून त्यातिल पाण्याने त्या पोत्या भोवती एक वर्तुळ आखलं. आणि एक मोठ्ठा दिर्घ श्वास घेवुन त्याने सगळ्यांच्या चेहर्याकडे एकदा नजर फिरवली. त्या वेळी राज चा चेहरा घामाने पुर्ण भिजला होता, श्रम केल्यामुळे नाही ना भिती मुळे, काहीतरी अति-माणसिक श्रमाचे ते प्रतिक होतं. खिशातील रुमालाने राज ने चेहऱ्यावरुन फिरवला. त्याने तिथे उभे असलेल्या सुधाकर , आलोक वगैरे लोकांकडे बघुन 'घबरु नका' असा इशारा केला. आणि त्या पोत्यात कडे वळाला.

## अभद्र

राज ने त्या पोत्यात हात घालता. सर्वांची उत्सुकता आधीच शिगेला पोहोचली होती. ती नष्ट झाली. राज ने राज ने पोत्यातुन हात बाहेर काढला तेव्हा जे दृश्य दिसले ते त्यांनी काधी पाहीले होते ना पाहायला मिळणार होते ना अशी काही अपेक्षा केली होती, राज च्या हतामध्ये एक सांगाडा होता, तो इतका लहान होता की तो बघाच कुठल्यातरी साधारण एका वर्षाच्या बालकाचा असावा असे वाटत होते.
त्या सांगाड्याची कवटी साधारण ठेवणिच्या तुलनेत मोठी होती, तो सांगाडा अतिशय अभद्र दिसत होता. त्याच्याकडे पाहताच अजुन त्यात जिव आहे असे वाटायचे, किंवा आपण एखाद्या निर्जिव गोष्टीकडे पाहतोय असे वाटत नव्हते.
'ज्या ठिकानी आपण खुदाई केली, आणि ज्या ठिकाणी आपण दोन महिने काम केले, जिथे बसुन जेवलो, मस्ति केली, त्याच ठिकाणी जमिणी मध्ये कधी काळी एका बालकाला पुरले गेले होते, आणि त्या पोराचा हा सांगाडा आपल्या समोर होता, याच्या अतृप्त आत्म्याने आपल्याला आजपर्यंत त्रास दिला' अशा सगळ्या विचारांनी आलोक च्या डोक्यात भयानक शिरशिरी आली, डोळ्यासमोर अंधारी आली, गरगरू लागले. तसा तो धाडकन जमिनिवर कोसळला.
आलोक कोसळललेला बघुन बाकिच्यांच्या पोटात गोळा आला, सगळ्यांनी उचलुन त्याला बाजूला नेले. तोंडावर पाणी मारले, तोन तिन मिनिटानी त्याला जाग आली व आपल्याला चक्कर आलेली हे त्याच्या लक्षात आले.
हा सगळा प्रकार चालू होता तेव्हा राज ने तो सांगाडा काढून त्या पोत्यावर ठेवला, त्याच्यावर ना ना प्रकारचे पाणी, गंध अंगारे आणि कसली पाने इत्यादी चढवले.
तोपर्यंत आलोक पुर्ण शुद्धीवर आलेला. आलोक ला घेवुन सगळे परत राज च्या भोवती जमले. आलोक शुद्धीवर आलेला बघुन राज ला बरे वाटले. अलोक कदे एक नजर टाकुन राज ने आपला मोर्चा परत त्या सांगाड्याकडे वळवला.

सगळे निट मांडले आहे याची खात्री करुन राज बाजुला आला. बबलू ला इशारा केला तसा बबलू हातात एक कशली तरी बाटली घेवुन आला. त्या बाटली मध्ये पेट्रोल होते. राज ने सगळी बाटली त्या सांगाड्यावर रिकामी केली, त्यावेळी राज च्या डोळ्यामध्ये प्रचंड राग ओसरत होता. या वेळी राज नेहमीपेक्षा जास्त तेजस्वि दिसत होता. सगळी बाटली रिकामी करुन आपल्या खिशामधुन सिगारेट काढली व आपल्या तोंडात धरली दुसऱ्या हाताने काडीपेटी हातात घेतली, त्यातील एक काडी पेटवुन सिगारेट शिलगावली व तीच काडी त्या सांगाड्याकडे भिरकावली तसा त्या सांगाड्याने पेट घेतला. आणि राज चे दोन कश व्हायचा आतच त्या सांगाड्याचा कवटीचा स्फोट झाला. त्यावेळी मात्र तो सांगाडा असहाय वाटत होता. पंधरा मिनिटे तो सांगाडा जळत राहीला, सगळी आग नष्ट झाल्यावर राज ने ते सगळे अस्थि एका पोत्यात भरले व बबलू कडे दिले, बबलु ते घेवुन लगेच तिथुन चालता झाला. बबलू कडे नजर करत राज ने आपल्या हातातील मोजे काढून फेकुन दिले.

***

## प्रश्न प्रश्न आणि प्रश्न

राज समोर खिडकीतुन रस्त्यावर चाललेली रहदारी न्यहाळत चहाचे घोट घेत होता. त्याच्या चेहऱ्यावर समाधान झळकत होते.
संध्याकाळचे सहा वाजले होते. सुधाकर, आलोक, रश्मि, अपुर्वा , अनिल, प्रदीप व अजमल सुधाकर च्या रूम च्या हॉल मध्ये ठरल्याप्रमाने जमले होते, सर्वांचे लक्ष राज कडे लागुन होते. प्रत्येकाच्या डोक्यात असंख्य प्रश्न ठाण मांडून उभे होते, सर्वांचे लक्ष राज काय बोलतोय याच्याकडे लागुन होते. हतातील चहाचा कप खाली ठेवुन राज सर्वांसमोर असलेल्या लाकडी खुर्ची वर बसला, एकदा त्याने ओळीने सर्वांच्या चेहऱ्यावरुन नजर फिरवली. आणि एक मोठा निःश्वास घेवुन बोलायला सुरवात केली.
"मला कळतंय, बरेच प्रश्न तुमच्या डोक्यात असणार, त्यातिल पहिला आणि महत्वाचा प्रश्न म्हनजे संकट टळले काय ? बरोबर ना ? याचे उत्तर आहे होय ! संकट टळले आहे, पण घडून गेलेल्या गोष्टी आपले अस्तित्व नेहमी तुम्हाला आपली जाणिव करुन देत राहतिल.
नन्दकिशोर ला आपण परत आणु शकत नाही, सुधाकर वर असलेली केस तुम्हाला लढवावि लागेल, तुमची गेलेली मॅगझीन ची ऑर्डर परत मिळू शकणार नाही, ज्या गोष्टी झाल्या त्या झाल्या आहेत, पण इथुन पुढे जि संकटे येणार होती ती आपण रोखु शकलो आहे. आता काय झाले आहे ? आणि आपण त्यावर काय केले ? नेमके कोणाचे काय चुकले ? हा सगळ्या प्रश्नांची उत्तर मी सांगत असलेल्या गोष्टींवरुन तुम्हची तुम्ही शोधा." असे म्हणुन राज ने चहाच्या कप मध्ये राहिलेला शेवतचा घोट घेतला व कप बबलू च्या हात दिला.
"सुधाकर, तुम्ही मला जे डॉक्युमेंट पाठवले होते ते आहे का आता इथे ?"
"हो माझ्याकडेच आहे !"
"आता मी एक एक प्रश्न विचारत जातो त्याची उत्तरे त्या डॉक्युमेंट च्या बेस वर दे."
"हा चालेल."
"तुमची मॅगझीन ची पहिली ऑर्डर घेवुन नेत असलेला ट्रक जयंती पुलावर अपघात होऊन सगळ्या प्रती पाण्यात नष्ट झाल्या, या घटनेची तारीख ?"
थोडी पाणे पलटून सुधाकर बोलला .."तेरा मे !"
"बरं ! नंदकिशोर ने सुसाईड कधी केली ?"
"...................तेरा जुन" ! थोडा गॅप घेवुन , त्यावेली सुधाकर चे डोळे थोडे विस्फारले होते.
"बरं ! तुला अटक कधी झाली ?"

“देवा ! ही गोष्ट लक्षात कशी आली नाही ? तेरा जुलै !”
“हम्म ! आलोक, तुला जेव्हा स्वप्ने पडायची, आणि तु घाबरुन जागा व्हायचा, तेव्हा घड्याळात साधारण किती वाजले असायचे ?”
“मला स्पष्ट आठवते राज, ते भयानक स्वप्न पहिलांदा जेव्हा पडले तेव्हा ठीक तिन वाजुन तेरा मिनिटे झाली होती”.
सुधाकर ला चांगले माहीत होते की आलोक ने उल्लेख केलेली वेळ या डॉक्युमेंट मध्ये मेन्शन केलेली नव्हती तरी सुद्धा राज ने बरोबर अंदाज लावला होता.
“वाळके बाबांनी तुम्हाला सांगितले होते , तुमच्या पाठीमागे खविस लागला आहे. खविस एक पिशाचाचा प्रकार. ” राज पुढे बोलू लागला “ एका लहान मुलाचे पिशाच, एकदा पाठीमागे लागले की तुम्हाला जगु ही देत नाही व मरु सुद्धा देत नाही. याच त्रासाला कंटाळुन नंदकिशोर ने आत्महत्या केली. या खविसाने सुरवातीला नंदकिशोर ला पकडले होते, आणि माझ्या माहितीप्रमाणे या खविसाने आपल्या पहिल्या शिकारावर अन्वयीत अत्याचार केले असणार, काय केले हे ते तो खविस आणि नंदकिशोर या दोघांनाच माहीत, पण नंतर या त्रासाला कंटाळून नंदकिशोर ने आत्महत्या केली.
त्याचानंतर खविसाने आलोक ला पकडले. व त्रास द्ययाल सुरवात केली, तेवढ्यात तुम्ही वाळके बाबांच्याकडे गेला आणि तेथुन अंगारा घेवुन आला.
सुधाकर वाळके बाबांनी दिलेली तुझी अंगाऱ्याची पुडी कुठे आहे ?”
सुधकर थोडा वरमुन बोलल “सर ती त्यच वेळी माझ्या हातुन गहाळ झाली”
“त्यामुळे खविसाने आलोक ला तसेच ठेवुन तुला पकडले, आणि तु जेल मध्ये गेलास.”

“या सगळ्या गोष्टीला एक बेस आहे, तो जसा सायंटिफि आहे तसाच तो अध्यात्मिक सुद्धा आहे.
पण प्रोब्लम हा आहे की दोन्ही क्षेत्रात काम करणारे लोक परस्परांना आपले सशत्र मानतात, त्यामुळे या दोन्ही गोष्टिंचा मेळ घालुन जो अभ्यास व्हायला पाहीजे तो होत नाही.
अगदी तुमच्या भाषेत सांगायचे झाले तर हा सगळा प्रकार सकारात्मक आणि नकारात्मक उर्जेचा आहे, भूत, पिशाच, समंध, वेताळ, खविर, ईर, विर, डाकिणी, शाकिनी, नाग या सगळ्या नकारात्मक उर्जा आहेत.
आणि आपण ज्यांना देव माणतो गणपती, मारुती, महादेव इत्यादी सकारात्मक उर्जा आहेत. आणि या सगळ्यांमध्ये एक पॅटर्न आहे तो ’वेळेचा’ गणेश चरुर्दशी वर्षातुन एकदा येते, आठवड्यातुन एकदा असलेला मंगलवार हा गणपतीचा, महिण्यातुन एकदा येणारी गणपतिची संकष्टी चांगल्या शक्तिंच्या बाबतीत वेळेचा असलेल्या पॅटर्न चे एक उदाहरण, या वेळी ती सकारात्मक उर्जा जास्त प्रभावी असते.
जसे सकारात्मक उर्जेचा जसा वेळेचा पॅटर्न असतो तसाच नकारात्मक उर्जेचाही असतो, या खविसाचे उदाहरण घ्या, या सगळ्या घतना तेरा तारखेला झाल्या, याचा अर्थ तेरा तारखेला त्याचा प्रभाव इतर दिवसांपेक्षा जास्त होता याचा अर्थ आपण जाळलेला सांगाडा ज्याचा आहे किंवा जो खविस तुमच्या मागे लागला होता त्याचा मृत्यु तेरा तारखेला झाला असणार, त्याच्या शिवाय तेरा तारखेवर प्रभाव असण्याचे कोणतेही कारण संभवत नाही. आपल्या घरामध्ये पुर्वी जर एखादी व्यक्ती मयत झाली असेल तर त्याच्या आठवणीत आपण श्राद्ध घालतो, ज्या दिवशी ती व्यक्ती मयत झालेली असते त्याच दिवशी आपण ते श्राद्ध घालतो, कारण त्या दिवशी त्या शक्तीचा प्रभाव इतर कोणत्याही दिवसाच्या तुलणेत जास्त असतो.
एखादी व्यक्ती मृत होते म्हणजे काय होते तर लॉ ऑफ एनर्जी च्या नियमा नुसार केवळ आणि केवळ उर्जेचे हस्तांतरण होते. त्या उर्जे मध्ये किती सकारात्मकता किंवा किती नकारात्मकता भरलेली आहे यावरुन त्या उर्जेची तिव्रता ठरते, हा भाग खुप क्लिश्ट आणि किचकट आहे, याच्या टेक्निकल भागात न जाता, मला इथे एवढंच सांगायचं आहे की प्रत्येक उर्जेचा एक टईम पॅटर्न ठरलेला असतो, ज्या नुसार त्या उर्जेची तिव्रता कंट्रोल होत असते. आणि तेरा तारखेला सगळ्या गोष्टी घडण्या पाठीमागे हेच कारण आहे.”

“आता येवुया तुमच्या ऑफिस वर ! आधिच्या काळामध्ये म्हणजे साधारण संभर वर्षे आणि त्याच्या मागे, लोक एखादे लहान मुल वारले की त्याला दहन द्यायची पद्धत नव्हति, ते शव अशा ठिकाणी पुरत होते जिथे जवळ वाहते पाणी असेल, अशि जागा राखुन ठेवलेली असत होती . तुमचे ऑफिस ज्या ठिकाणी आहे ती जागा अशाच मेलेल्या लहान लहान प्रेतांनी भरलेली आहे, त्यापैकीच एक प्रेत ज्याला खविस म्हणतात तुमच्या मागे लागले होते, आणि ते कधीच थांबले नसते.
काल आपण त्या पिशाचाचे शव शोधुन त्याला शाक्त पद्धतीने दहन दिले आहे, त्यामुळे त्या पिशाचा पासुन तुम्हाला काहीद धोका नाही. पण मित्रांनो ! मी ज्या रात्री तुमच्या प्रकरणाचा अभ्यास करयाला ज्या रात्री बसलो तेव्हाच मी निघयाची गडबड केली तसेच इथे आल्यावर सुद्ध लगेचच कामाला सुरवात केली, तेव्हा तुम्हाला काही बोललो नाही कारण तुम्हाला आनखी घाबरवायचे नव्हते, वास्तवीक अशी प्रकरने लवकर तडीस जात नाही, हा काही नॉर्मल भुत झपाटणे किंवा करणी करणे प्रकार नाहीये, त्यामुळेच हे प्रकरण वाळके बाबांच्या हाता बाहेरचे होते, व मला ही शंका होती की आपण या प्रकरणाच्या मुळाशी जाऊन त्याचा सोर्स शोधायला किती वेळ आणि दिवस जाणार कोणास ठाऊक, आणि या दिरंगाई मध्ये पुढची तेरा जी आजपासुन आता फक्त एका आठवड्यावर येवून ठेपली आहे ती ओलंडू द्यायची नव्हती, आणि देवाच्या कृपेने आपण हा तिढा लवकर सोडवण्यात सफल झालो आहोत. तुम्हा सर्वांचे नशिब म्हना किंवा तुमच्या आई-वडीलांचे पुण्य काहीही म्हणा, खुप मोठ्या संकटाच्या तावडीतुन तुम्ही सुटला आहात. आता घाबरायचे काही कारण नाहीये.”
“पण राज! ऑफीस मध्ये गेल्यावर खुदाई साठी आपण हॉल ची निवड कशी केली ? तुला कसे कळाले की त्या ठिकाणी काहीतरी आहे.” अजमल बोलला.
“काही गोष्टी या रहस्य म्हणुनच ठेवायच्या असतात, या अशा गोष्टी आहेत ज्या माझ्या गुरु नी कुठेही शेअर करण्यास मला प्रतिबंध घातला आहे ” राज हसुन बोलला.
आपण किती मोठ्या संकटातुन बचावलो आहे याची आलोक, सुधाकर ना थोडीफार कल्पना आली होती. रश्मि आणि अपुर्वाने आपल्या अश्रुंचा बांध केव्हाच तोडला होता, आणि सुधाकर आणि अलोक चे हृदय भरुन आले होते, या मध्ये थोडा आनंद होता, राज नावाच्या अनोळखी व्यक्ती बद्दल वाटनारी क्रुतज्ञता होती, जे काही गमावले अशा गोष्टिंबद्दल थोडे दु:ख ही होते, या सगळ्या गोष्टी आता डोळ्यातुन अश्रुंच्या वाटेने बाहेर पडू लागल्या.

****

## निरोप

सर्व मित्र परिवाराने राज आणि बबलु सोबत जेवनाचा आस्वाद घेतला, चेष्टा मस्करी करत कसे रात्रीचे दहा वाजले कळालेही नाही, बऱ्याच महिन्या नंतर घरी हे वातावरण परत आले होते. ’किती बरे वाटत होते, आधी जेव्हा असे वातावरण असायचे तेव्हा त्याचे काही वाटत नव्हते, पण आता मात्र प्रत्येक क्षणाची किंमत कळते, आपल्याकडे जे आहे त्याची किंमत कळायला ती गोष्ट आपल्यापासुन दुर गेल्याशिवाय कळत नाही. आणि ही किंमत कळवून द्यायला आयुष्यात अशा प्रकारच्या घटना घडत असतात, घटणा काहीही असो, किंवा संकट कोणते ही असो, न डळबळता त्याला समरे जाणे एवढे तर आपल्या हाती असते, किंवा त्याच्या शिवाय पर्यायच नसतो, अशा वेळी प्रत्येकाच्या मदतीला राज सारख्या व्यक्ती येतिलच असे नाही, काही संकटांना एकट्याने सामोरे जावे लागते, आणि एकट्याने लढावे लागते, पण एक गोष्ट विसरता कामा नये, कोणतीही गोष्ट स्थाई नसते, प्रत्येक गोष्टीला अंत असतो, कोणतेही संकट कितीही मोठे असो, कधी ना कधी संपणारच, पण ही लढाई त्यासाठी असते की ते संकट नष्ट झाल्यावर

जो मोकळा श्वास आहे तो आपण "मिळवला" आहे हे आपल्याला छातीठोक पणे जगाला सांगता आले पाहीजे.' सुधाकर विचारांमध्ये गर्क असताना राज च्या फोन च्या रिंग ने त्याची तंद्री भंगली

"हॅलो ! "
"----------"
"हो हो, निघतोय ! उद्या सकाळ पर्यंत पोहोचतोय !" आणि राज ने फोन कट केला.
"हे काय ? तुम्ही जानार ? ते ही आता ?" आलोक.
"होय मित्रा ! जावे लागेल ," असे म्हणुन राज ने बबलु कडे पाहीले.
"बबलू सगळे रेडी आहे का रे ?"
"होय भैया !"
"चला तर मग !"
सुधकर व आलोक राज ला सोडायला त्याच्या गाडी पर्यंत आले. राज च्या मदतिची तुलना पैशात करणे शक्यच नव्हते, तेव्हा आम्ही तुमच्यासाठी काय करु असे राज ला विचारता,
"तुम्ही आता स्वत:ची मदत करा आणि तुमच्याकडून दुसऱ्यांची मदत करवुन घ्या" एवढेच हसत हसत बोलला.
पुन्हा एकदा हस्तांदोलन करुन राज आणि बबलू गाडीत बसले.
आणि गाडी वाऱ्याच्या वेगाने धाऊ लागली.